# श्रीयुत अरविंद घोस.

अरविंद घोस यांचें नांव आज भरतखंडांत गाजत आहे. बंगाल
[illegible]य पक्षाचें पुढारीपण असल्या थोर योग्यतेच्या पुरुषाकडे आल्या-
[illegible]क्षास मोठीच मदत झालेली आहे. अरविंद बाबू वक्ते नाहींत, लेखक
[illegible] त्यांच्या भाषणांत जी कळकळ आढळून येते ती फारच थोड्यांच्या
[illegible] यामुळें त्यांचीं भाषणें ह्मणजे प्रासादिक होत असीं साहजिकपणें
[illegible] सुदैवानें सुरतची कांग्रेस आटपल्यानंतर आपल्या महाराष्ट्रांत त्यांनीं
[illegible]त केला व कांहीं व्याख्यानेंही दिलीं. हीं व्याख्यानें सर्व मराठी वा-
[illegible]वीं या हेतूनें आह्मीं या लहानशा पुस्तकांत महत्वाचीं सात व्या-
[illegible] आहेत. अरविंद बाबूंचें पूर्वचरित्रही अपूर्व असल्यामुळें तें येथें

[illegible]ांत—विशेषत: रंगपूर आणि खुलना जिल्ह्यांत—डा. के. डी. घोस
[illegible]च्या परिचयाचें आहे. हे मोठे स्वार्थत्यागी असून गरीबांविषयीं
[illegible] असे. यांना अद्यापि तिकडचे लोक दुवा देतात. ह्यांच्या पोटीं
[illegible] जन्म १८७२ च्या आगस्ट महिन्यांत झालें. हे पांच सहा वर्षांचे
[illegible] दार्जीलिंग येथें सेंट पाल स्कूलमध्यें विद्याभ्यासाकरितां पाठ-
[illegible] नंतर १८७९ सालीं ह्मणजे सातव्या वर्षी यांना विलायतेस
[illegible]लें. विलायतेस मँचेस्टर येथें हे एका पाद्र्याच्या घरीं रहात असत.
[illegible]े तेथील सेंट पाल स्कूलमध्यें गेले. तेथें एक स्कालरशिप मिळाली
[illegible]नीं आपला अभ्यास चालविला. १८९० सालीं सिविल सर्वि-
[illegible]ास होऊन त्यांचा अकरावा नंबर आला. सिविल सर्विसच्या
[illegible] सारखे विषय न घेतां यांनीं इतिहास, अर्थशास्त्र, इंग्रजी वाङ्-
[illegible] वगैरे अवघड विषय घेऊन त्यांत प्रावीण्य प्रगट केलें. यांनीं
[illegible] या विषयांत जितके मार्क मिळविले तितके अद्याप सिविल
[illegible]ांत कोणालाही मिळालेले नाहींत. त्याच वर्षी ग्राक व लॅटन
[illegible] शिष्यवृत्ति यांना मिळाली व ते केंब्रिज येथें अभ्यासास गेले

# श्रीयुत अरविंद घोस.

अरविंद घोस यांचें नांव आज भरतखंडांत गाजत आहे. बंगाल
ीय पक्षाचें पुढारीपण असल्या थोर योग्यतेच्या पुरुषाकडे आल्या-
पक्षास मोठीच मदत झालेली आहे. अरविंद बाबू वक्ते नाहींत, लेखक
त्यांच्या भाषणांत जी कळकळ आढळून येते ती फारच थोड्यांच्या
यामुळें त्यांचीं भाषणें ह्मणजे प्रासादिक होत असी साहजिकपणें
सुदैवानें सुरतची कांग्रेस आटपल्यानंतर आपल्या महाराष्ट्रांत त्यांनीं
केला व कांहीं व्याख्यानेंही दिलीं. हीं व्याख्यानें सर्व मराठी वा-
ीं या हेतूनें आह्मीं या लहानशा पुस्तकांत महत्वाचीं सात व्या-
आहेत. अरविंद बाबूंचें पूर्वचरित्रही अपूर्व असल्यामुळें तें येथें

ांत—विशेषत: रंगपूर आणि खुलना जिल्ह्यांत—डा. के. डी. घोस
च्या परिचयाचें आहे. हे मोठे स्वार्थत्यागी असून गरीबांविषयीं
असे. यांना अद्यापि तिकडचे लोक दुवा देतात. ह्यांच्या पोटीं
जन्म १८७२ च्या आगस्ट महिन्यांत झालें. हे पांच सहा वर्षांचे
दार्जीलिंग येथें सेंट पाल स्कूलमध्यें विद्याभ्यासाकरितां पाठ-
नंतर १८७९ सालीं ह्मणजे सातव्या वर्षी यांना विलायतेस
लें. विलायतेस मँचेस्टर येथें हे एका पाद्र्याच्या घरीं रहात असत.
ी तेथील सेंट पाल स्कूलमध्यें गेले. तेथें एक स्कालरशिप मिळाली
नीं आपला अभ्यास चालविला. १८९० सालीं सिविल सर्वि-
ास होऊन त्यांचा अकरावा नंबर आला. सिविल सर्विसच्या
सारखे विषय न घेतां यांनीं इतिहास, अर्थशास्त्र, इंग्रजी वाङ्-
वगैरे अवघड विषय घेऊन त्यांत प्रावीण्य प्रगट केलें. यांनीं
या विषयांत जितके मार्क मिळविले तितके अद्याप सिविल
ंत कोणालाही मिळालेले नाहींत. त्याच वर्षी ग्रीक व लॅटन
शिष्यवृत्ति यांना मिळाली व ते केंब्रिज येथें अभ्यासास गेले

यांच्या सयाजीराव गायकवाडांशी व यांची गांठ पडून सयाजीरावांनी बडोद्याच्या सिविल सर्विसमध्यें यांची नेमणूक केली. कांहीं वर्षे गायकवाड सरकारच्या खाजगी कारभाऱ्याचें काम केल्यावर यांना बडोद्याच्या कालेजाचे व्हाइस प्रिन्सिपाल नेमण्यांत आलें. या जागेवर असतांना यांना दरमहा ७०० रुपये पगार मिळत होता. १९०६ सालीं बंगाल्यांत राष्ट्रीय कालेज निघावयाचें ठरलें व तेथील व्यवस्थापकांनीं अरविंद बाबूंना आमंत्रण दिलें. त्याबरोबर राष्ट्रकार्यार्थ ७०० रुपयांची नोकरी–सयाजीराव गायकवाड जाऊं देण्यास तयार नसतांही–सोडून ते कलकत्त्यास गेले. ७०० रुपये पगार असतांना अरविंद बाबूंच्या जवळ कांहीं शिल्लक रहात नसे इतके ते उदार होते. आतां तर त्यांनीं आपला खाजगी खर्च दरमहा पन्नास रुपयांच्या आंत आणून ठेवला आहे असें सांगतात. गेल्या सालच्या आगष्ट महिन्यांत यांच्यावर खटला झाला तेव्हां राष्ट्रीय कालेजच्या प्रिन्सिपालच्या जागेचा यांनीं राजीनामा दिला. परंतु परमेश्वरकृपेनें खटल्यांतून मुक्त झाल्यावर यांना पुन्हां बोलावण्यांत आलें व सध्यां ते तेथें प्रोफेसर आहेत. अरविंद बाबूंचे दोघे बंधूही विलायतेस शिक्षणाकरितां गेले होते. एक कलकत्त्यास प्रेसिडेन्सी कालेजामध्यें इंग्रजी भाषेचे प्रोफेसर आहेत, आणि दुसरे कुचबिहारच्या महाराजांचे खाजगी कारभारी आहेत. अरविंद बाबू लहानपणापासून विलायतेच्या वातावरणांत इतके वाढलेले होते कीं, त्यांना बंगाली भाषा समजत असली तरी गेल्या सालापर्यंत बोलतां येत नव्हती ! इतका परकी संस्कार झालेला असून देखील त्यांची स्वदेशभक्ति लोकोत्तर आहे ही गोष्ट अर्ध्या हळकुंडानें पिंवळे होणाऱ्या विलायतयात्रेकरूंनीं मनन करण्यासारखी नाहीं असें कोण ह्मणेल ?

---

# श्रीयुत अरविंद घोस यांचीं महाराष्ट्रांतील व्याख्यानें.

## व्याख्यान पहिलें.

## बंगाल्यांतील राष्ट्रीय चळवळ.

( पुणें येथें गायकवाडाचे वाड्यांत सोमवार तारीख १२ जानेवारी १९०८ रोजीं सायंकाळीं रा. अण्णासाहेब पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं झालेलें व्याख्यान ).

सभ्य गृहस्थहो, माझ्याबद्दल आपणांस जें प्रेम वाटत आहे त्यामुळेंच मी भाषण करण्यास उभा राहिलों आहें. मी तुमच्या हातांत सांपडल्यावर तुह्मी मला व्याख्यान देण्याचा हुकूम कराल अशी पुण्यास येतांना माझी कल्पना नव्हती. मी आपल्या मित्रांस भेटून अगदीं मुकाट्यानें परत जाणार होतों. पण मला व्याख्यान देण्याबद्दल हुकूम झाला. हुकूम ह्मणण्याचें कारण असें आहे कीं, मी वक्ता नाहीं. माझें शस्त्र जिव्हा नसून लेखणी आहे. वास्तविक मी अगदीं कोनाकोपऱ्यांत असावयाचा, परंतु दयाळू सरकारानें मला लोकांपुढें ओढून आणलें आहे. आपल्या देशांत सार्वजनिक चळवळींमध्यें पडणाऱ्या माणसास दोन गोष्टींची वारंवार जरूर पडते. एक तर राजेसाहेबांच्या भोजनालयाचा पाहुणचार स्वीकारणें, व दुसरी लोकांनीं भाषण करण्याचा आग्रह केल्यावर भाषण करणें. जेथें जेथें मी जातों तेथें तेथें मला भाषण करण्यास सांगतात. त्याप्रमाणें येथेंही सांगण्यांत आलें. मी आतां बोलणार काय हें माझें मलाच समजेना. माझे विचार मला जुळवून सांगतां येत नाहींत. पण आपलें मजवर जें प्रेम आहे त्यावर भरंवसा ठेवून मी कांहीं तरी बोलतों. अर्थातच मी आपणांस फार वेळ त्रास देणार नाहीं. कदाचित् या विषयामध्यें मी वहावलों तर गोष्ट निराळी. पण न वहावण्याविषयीं मी काळजी घेईन. नुकताच मला एक विचार सुचला व त्यावरच मी आतां बोलणार आहें. बंगालमध्यें जो एक विचार आह्मांस प्रिय वाटतो

ग्रेसमध्यें या गोष्टीचा अगदीं कळस झाला. कांहीं लोक शांतवृत्तीचे असतात,
त्यांना हें वर्ष कमनशीबाचें वाटेल. या वर्षीं आपला देश कांहींशा भयंकर व कडक
परीक्षेमधून उतरला आहे. " कांहींशा " ह्मणण्याचें कारण असें कीं, इतर
देशांवर जे जे प्रसंग गुदरले व त्यांमधून ते ज्या ज्या तऱ्हेनें पार पडले त्यांच्या
मानानें आमच्या देशाला खरी परीक्षा मुळींच द्यावी लागली नाहीं. पण आपल्या
पूर्वीच्या संवयीकडे पहातां मात्र हा प्रसंग भयंकर व कडक होता एवढेंच. विशे-
षतः बंगाल्यामध्यें आह्मांला फार संकटें सोसावीं लागलीं. सर्व देशावर पुष्कळ
आपत्ति आली. सर्वांत शेवटची आपत्ति ह्मणजे परवां सुरतेस घडलेला प्रसंग
होय. ह्यासंबंधानें कांहीं लोक " पुढें काय " असा प्रश्न विचारतात. आमच्यामध्यें
संशयी व निवृत्तिपर स्वभावाचीं कांहीं माणसें आहेत. तीं नेहमीं विचारतात कीं,
" हें सर्व तुह्मी कशासाठीं करीत आहां? इतके पुढें तुह्मी कसे चाललां? असल्या
गोष्टींस हात घालण्याचें सामर्थ्य आपल्यामध्यें आहे कोठें? ज्या सामर्थ्याच्या जोरावर
तुह्मीं हें चालविलें आहे तें सामर्थ्य कोठें आहे तें दाखवा. " त्याला मी बडोद्यास
जें उत्तर सांगितलें तेंच येथें सांगतों. हिंदी लोक भोळ्या समजुतीचे असतात
असें नेहमीं सांगण्यांत येतें. त्याप्रमाणें मी एक अतिशय भोळ्या समजुतीचा
माणूस आहें. **" जें जें ह्मणून आह्मी हिंदी लोक हातीं धरूं तें तें खा-
त्रीनें पार पाडूं "** अशी माझी एक भोळी समजूत आहे. आज पुष्कळ वर्षें
ही माझी समजूत किंवा श्रद्धा कायम आहे. आमच्या **वन्दे मातरम्** पत्राचा
तर हा मंत्र आहे. आह्मी जेव्हां बंगाल्यामध्यें या नव्या चळवळीस—या राष्ट्रीय
चळवळीस—या स्वदेशी बहिष्काराच्या चळवळीस—प्रारंभ केला त्यावेळीं आह्मीं य-
शापयशाचा मुळींच विचार किंवा हिशोब केला नव्हता. या चळवळीचा स्वीकार
एकदम आणि एकाएकीं करण्यांत आला. बंगाल्यामध्यें प्रथमतः कांग्रेसची चळवळ
जोरांत होती. अर्ज पाठविल्यानें आपणांस पाहिजे तें मिळेल, असा सर्व बंगाली
लोकांचा समज होता. पण यापासून उपयोग नाहीं; इतकेंच नव्हे तर उलटपक्षीं
नुकसान आहे असें हळूहळू लोकांना वाटूं लागलें. लोकांचा पहिला समज नाहींसा

होत चालला ! आणि ते निराश झाले. स्वदेशी चळवळीस प्रारंभ होण्याच्या आधीं तीन चार वर्षे मी जेव्हां बंगाल्यांत गेलों तेव्हां लोकांच्या अंत:करणावर निराशेचा पगडा बसलेला असून ते अगदीं निरुत्साही झालेले मला आढळून आले. आह्मी इतकी राजकीय चळवळ करतों खरी, पण आमची नीट अवस्था नाहीं, आह्मी अधोगतीला चाललों आहोंत, अशी सामान्य लोकांची मनोवृत्ति होती. जुन्या कल्पनेवर—ज्या कल्पनेला यश येत नाहीं असें आढळून आलें त्या कल्पनेवर—विश्वास असलेले व तिला चिकटून बसलेले लोक होते, पण त्यांची संख्या अगदीं थोडी होती. लार्ड कर्झन ( यांनीं आपलें कल्याण केलें ह्मणून त्यांचा एक पुतळा उभारावा असें माझें मत आहे ) कांहीं विशिष्ट विचार मनांत धरून इकडे आले. त्यांनीं आपलें धोरण सुरू केलें व त्याचा रोंख विशेषतः बंगाल्यावर धरला. त्यांनीं बरेच कायदे पास केले. म्युनिसिपालिटीचा कायदा पसार केला; सर्व ठिकाणीं–विशेषतः बंगाल्यांत–निषेध प्रदर्शित करण्यांत आला असतांही त्यांनीं युनिव्हर्सिटीचा कायदा केला; आणि अखेरीस वंगभंगाचा शेवटचा घाव मारून त्यांनीं सर्व बंगाल्यांचीं अंतःकरणें विदीर्ण केलीं. बंगाली भाषा बोलणाऱ्या लोकांच्या ऐक्याचा विध्वंस करण्यांत आला. बंगालच्या फाळणीमुळें बंगाली लोकांच्या अंतःकरणास केवढा धक्का बसला याची कल्पना इतर प्रांतांतल्या लोकांस होणार नाहीं. बंगाली लोकांत वैशिष्ट्य हें आहे कीं, ते लोक कल्पनामय व विकारमय आहेत; आजपर्यंत आपण एका प्रांतामध्यें होतों व हें आपलें ऐक्य नाहींसें करण्यांत आलें, ह्या कल्पनेनें त्यांच्या मनास धक्का बसला. निराशेची व निरुत्साहाची प्रवृत्ति कायम ठेवणें यापुढें बंगाली लोकांना अशक्य झालें.मामुल वहिवाटीप्रमाणें त्यांनीं अर्जं पाठविले, सभा भरविल्या, निषेध प्रदर्शित केला, नम्रपणानें प्रार्थना केल्या, ठराव पास केले—सर्व कांहीं करून पाहिलें. प्रत्येक शहरांतून व प्रत्येक गांवांतून निषेधप्रदर्शक सभा झाल्या, पण काडीमात्र उपयोग झाला नाहीं. आतां कांहीं तरी केलें पाहिजे असें बंगाली लोकांना वाटूं लागलें, व स्वदेशी–बहिष्काराची चळवळ सुरू झाली. ही चळवळ सुरू केल्याचें श्रेय मागाहून पुढाऱ्यांनीं आपल्याकडे घेतलें खरें, पण वस्तुस्थिति तशी नाहीं. वंगभंग होण्यापूर्वींच स्वदेशी चळवळीस बंगाल्यांत थोडी थोडी सुरवात होऊन तिचें पाऊल पुढें पडत चाललें होतें. "आपण आतां बहिष्कारास

ही चळवळ कलकत्यास येऊन थडकली. त्याच वेळीं चिनी लोकांनीं अमेरिकन मालास बहिष्कार घातलेला असून तो बहिष्कार यशस्वीही झाला होता. तेव्हां ही बहिष्काराची कल्पना उत्कृष्ट आहे असें कलकत्यांतील लोकांच्या ध्यानांत आलें, व त्यांनीं ती तावडतोब उचलली. पण पुढाऱ्यांच्या मनांत शंका आली. ते ह्मणूं लागले, "हें कसें शक्य आहे बुवा ? हें करण्यास लोकांची दानत श्रेष्ठ पाहिजे." स्वदेशी चळवळीचा जन्म पुष्कळ वर्षांमागें दक्षिणेंत पुण्यास झाला व तेथून ही कल्पना कांहीं जणांनीं बंगल्यांतही नेली. पण त्यावेळीं बंगालनें तिचा अंगीकार केला नाहीं. ही चळवळ यशस्वी होण्याची आशा बाळगणें शुद्ध वेडेपणा आहे, निव्वळ मनोराज्य आहे, असें त्यावेळीं बंगाली लोक ह्मणाले. पुन्हां एकदा संमती-वयाच्या कायद्याचे वेळीं, सरकाराविरुद्ध आपणांजवळ असलेलें एक शस्त्र या दृष्टीनें हिचा पुकारा करण्यांत आला होता. या वेळची चळवळ सांप्रतच्या बहिष्काराच्याच अर्थाची होती. परंतु त्यावेळींही पुढाऱ्यांनीं तिच्यावर 'अशक्य' असा छाप मारला. ते म्हणत कीं, 'स्वदेशी चळवळीला यश मिळणें अशक्य आहे आणि बहिष्कार तर त्याहूनही अशक्य आहे. अर्थ-शास्त्राच्या दृष्टीनें बहिष्कार चुकीचा ठरतो. इतर देशांमध्यें जरी बहिष्काराला यश आलें तरी त्यांची व आपली परिस्थिति ह्यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. आपल्या लोकांत दानतीचा जोर नाहीं.' पुढारी लोकांचे विचार अशा प्रकारचे असण्याचें कारण लोकांच्या कर्तृत्वशक्तीवर त्यांचा विश्वास नाहीं हेंच होय. ही चळवळ निष्फळ होऊन तुह्मी मात्र हास्यास्पद व्हाल असें ते ह्मणत. पण या प्रसंगीं सुरू झालेल्या चळवळीच्या वेळीं लोकांमध्यें नवीन धमक आली. मागच्याप्रमाणें आतां त्यांनीं पुढाऱ्यांकडे लक्ष दिलें नाहीं. लोक म्हणाले, "यापुढें तुमच्या शंका कुशंका ऐकण्यास आह्मांस फुरसत नाहीं. आह्मी तुमचें ह्मणणें ऐकत नाहीं. ही चळवळ यशस्वी होवो अगर न होवो आह्मी ती करणार. आह्मांस यश मिळतें कीं नाहीं, हें आह्मी प्रत्यक्ष पहाणार.

यश येवो अगर न येवो, आमचें नशीब फुटलेलें आहेच; तर मग आम्ही प्रयत्न करून तरी कां पाहूं नये?" यावेळीं लोकमताचा प्रवाह इतका जोमदार होता कीं, पुढाऱ्यांना त्याविरुद्ध जाणें शक्य नव्हतें. अखेरीस बहिष्कारास त्यांनीं निरुपायानें आपली संमति दिली, व "सहा महिनेपर्यंत बहिष्काराची चळवळ करून वंगभंग रद्द होतो कीं काय तें आपण पाहूं" असें ते म्हणाले. इंग्रज अधिकाऱ्यांवर शह बसविण्यास याचा उपयोग किती होईल तें सहा महिने पहावयाचें, उपयोग झाल्यास बरेंच झालें, नाहीं तर पुढें बहिष्कार सोडून द्यावयाचा, असाच ठराविक विचार करून पुढाऱ्यांनीं ही बहिष्काराची तळी उचलली. परंतु बंगालमध्यें लोकांच्या विचाराला एक निराळी दिशा आधींपासूनच लागत चालली होती. हे विचार आतां उघडपणें पुढें येण्यास सुरवात झाली. आजपर्यंत आपण लेंच्यापेंच्या साधनांचा उपयोग करीत आलों; आह्मी पंगू आहों असा आपण एकसारखा ध्यास घेत आलों, पण हा पंगूपणा मूळचा नसून राजकीय परिस्थितीमुळें उत्पन्न झालेला आहे. आम्हीं स्वतःवरच जादूचा प्रयोग करून घेतल्यामुळें हा पंगूपणा आम्हांस खरोखरीचा वाटूं लागला. आतां ही कल्पना-ही जादू-झुगारून दिली पाहिजे. आपण आपल्या स्वतःच्या पराक्रमावर निष्ठा ठेवली पाहिजे. स्वामी विवेकानंद बारंवार या आत्मनिष्ठेसंबंधानें बोलत असत. आह्मी जें जें ह्मणून मनांत आणूं तें तें सिद्धीस नेऊं; अशा प्रकारच्या मतांचा फैलाव लोकांमध्यें अदृश्य रीतीनें झालेला होता. ह्या विचारांना आतां दृश्य स्वरूप मिळालें व तें लोकांना तावडतोब पटलें. बहिष्काराची चळवळ करून त्यांत आपणांला यश येतें कीं नाहीं हें पहावयाचें असा या नवीन विचाराच्या लोकांनीं पक्का निश्चय केला. एक राजकीय युक्ति या नात्यानें बहिष्काराची चळ-वळ चालवूं नये, ती कांहीं मर्यादेपर्यंत चालवावयाची असा निर्बंध नसावा, तर ही चळवळ एकसारखी जारीनें चालूच ठेवावी, असें या लोकांचें ह्मणणें होतें. पुढाऱ्यांना बहिष्काराची चळवळ सहा महिन्यांपर्यंत-फाळणी रद्द होईपर्यंत-चालवावयास हवी होती, पण लोकांना ही मर्यादा नको होती. फाळणी रद्द होईपर्यंत बहिष्कार घालावयाचा अशी शपथ घेण्यास पुढाऱ्यांनी सांगितलें. पण अशी मर्यादित शपथ घेण्याचें लोकांनीं साफ नाकारलें. लोकांना आपलें सामर्थ्य उमगलें होतें. आपण असमर्थ नसून समर्थ आहों ह्याची त्यांना ओळख

बंगभंग रद्द झाला नाहीं, तरी तिला चांगलेंच यश आलें आहे. बहिष्काराचा विचार लोकांच्या मनांत अगदीं वज्रलेप झाला. लोकांच्या पराक्रमावर निष्ठा ठेवल्यानें काय फळ प्राप्त होतें हें या पहिल्याच उदाहरणावरून सिद्ध झालें.

बंगाली लोक कांहींएक करूं शकणार नाहींत, त्यांच्यांत खरी कळकळ नाहीं, धैर्य नाहीं, स्वार्थत्याग तर मुळींच नाहीं, असें मी बंगाल्यांत आल्यापासून एकसारखा ऐकत होतों. बंगाली लोकांचा उत्साह क्षणिक असतो असा सर्वत्र समज होता. नवी चळवळ सुरू झाली तेव्हां पुढारी ह्मणत होते, " ही उठावणी नेहमींपेक्षां अधिक जोराची दिसते खरी, तरी ती लवकरच नाहींशी होईल. परदेशी कपडा सुबक असून स्वस्त मिळत असतां केवळ एका मनोविकाराच्या नादीं लागून आडांमरडा व महाग मिळणारा स्वदेशी कपडा लोक घेतील तरी कसे ? व घेतला तरी किती दिवस घेतील ? " पण या त्यांच्या शंकांना आह्मी अगदीं कंटाळलेलों होतों. आमच्यामध्यें दोष असले, तरी ते आहेत आहेत असें रडगाणें गात न बसतां ते नाहींत अशीच मनाची समजूत करून त्यांना आह्मी नाहींसे करणार. आजपर्यंत लोकांनीं केलेल्या चळवळी यशस्वी कां झाल्या नाहींत ? तर लोकांचा स्वतःच्या कर्तबगारीवर विश्वास नव्हता आणि अह्मांस शहाणपणा शिकविणाऱ्यांनींही हेंच शिकवून ठेवलें होतें ह्मणून. पण या चळवळीचा सर्वांनीं स्वीकार केला. लहान लहान पगारावर रखडणारे शाळामास्तर, लहान दुकानदार, कारकुनी पेशाचे लोक या सर्वांनीं बहिष्कारतत्वाचा अवलंब केला. बंगाली तरुणांना कोणतीही खरी कामगिरी करितां येणार नाहीं, आत्मयज्ञ करणें त्यांच्यानें होणार नाहीं, अशी पूर्वीं समजूत होती. परंतु बंगाली तरुणांनीं खरा स्वार्थत्याग करून दाखविला. विलायती माल विकत घेण्यास गेलेल्या गिऱ्हाइकांचीं त्यांनीं मनें वळविलीं, त्यांनीं आपल्या अभ्यासाचा वेळ खर्च केला, पोलीसची दंडुकेशाही सहन करण्यास ते तयार झाले, तुरुंगांत जाण्याची देखील त्यांनीं भीति बाळगिली नाहीं. नोकऱ्यांसाठीं धडपड न करितां,

लोकांच्या घरोघर विनफायद्यानें स्वदेशी कापड पुरविण्याचें त्यांनीं मनावर घे-
तलें. ज्या मालाचा आपणांस खप वाढवावयाचा असेल त्या मालाची किंमत
कांहीं तरी कृत्रिम पद्धतीनें कमी करावी लागते असा अर्थशास्त्राचा नियम आहे.
या नियमाप्रमाणें फायदा न घेतां मूळ किंमतीला कापड विकण्याचें त्यांनीं म-
नावर घेतलें, व अर्थातच तो कपडा गिऱ्हाईकांना स्वस्त पडूं लागला. अशा
रीतीनें स्वदेशी कापडाची मागणी व पुरवठा वाढत गेला. प्रथम विलायती
कापड स्वदेशी कापडापेक्षां स्वस्त असे; तें पुढें सारख्या किंमतीचें झालें आणि
अखेरीस तर स्वदेशी कापडच स्वस्त मिळूं लागलें. याप्रमाणें स्वदेशी चळवळ
बंगाल्यांत यशस्वी झाली.

या स्वदेशी चळवळीपासून लवकरच राष्ट्रीय शिक्षणाचा उगम झाला.
स्वदेशी चळवळीस मदत करण्यास पुढें आलेल्या तरुणांचा गोरा अधिकारी-
वर्ग छळ करूं लागला तेव्हां राष्ट्रीय शाळा पाहिजेत असा पुकारा झाला.
सरकारी युनिव्हर्सिटयांमधून देण्यांत येणारें शिक्षण अपुरें आहे अशी ओरड
बंगाल्यांत पुष्कळ वर्षांपासून चालली होती. निरनिराळ्या विद्वानांनीं यासंबंधा-
चे लेख लिहून ठेवले होते, पण खऱ्या राष्ट्रीय शिक्षणास कोणीं आरंभ केला
नव्हता. " आम्हांस राष्ट्रीय शिक्षण द्या " असें विद्यार्थी पुढाऱ्यांना म्हणूं ला-
गले. पुढारी म्हणाले, हें एक नवीनच वेड उद्भवलें आहे ! राष्ट्रीय शिक्षण
अगदीं अशक्य असें पुढाऱ्यांनीं ठरविलें. खाजगी कॉलेजांचे मालक असलेले
पुढारी देखील असेंच म्हणाले. आम्ही पाहिजे तर आपल्या शाळा तुमच्या ह-
वालीं करितों पण सरकारी युनिव्हर्सिटीची व त्यांची एकदां फारकत झाली
म्हणजे सर्व विद्यार्थी आमच्या शाळा सोडतील असा मुद्दा त्यांनीं पुढें आणला.
विद्यार्थी सरकारी शाळा सोडण्यास तयार झाले; पण त्यांना उत्तेजन मिळालें
नाहीं. पण सर्वच लोक कांहीं नन्नाचा पाढा वाचणारे नव्हते. कांहीं जणांनीं
विद्यार्थ्यांच्या म्हणण्यास रुकार दिला व हें काम हातीं घेतलें. प्रथमतः रंगपूरचे
विद्यार्थी सरकारी शाळेंतून निघाले आणि राष्ट्रीय शाळा पाहिजे अशी त्यांनीं
मागणी केली. परत शाळेंत जाण्यास जो दंड द्यावा लागतो तो देण्यास किंवा
जी माफी मागावी लागते ती मागण्यास आम्ही तयार नाहीं, आमच्या शि-
क्षणाची तजवीज तुम्ही करा, असें त्यांनीं सांगितलें. अशा प्रकारें रंगपूर येथें

ते द्या. मैमनसिंगचे दुसरे एक जमीनदार पुढें आले. ते ह्मणाले, मी श्रीमान् जमीनदार आहें, मी दहा लक्ष रुपये सांठवले आहेत त्यांतले पांच लक्ष घ्या. याप्रमाणें मदत मिळाल्यावर राष्ट्रीय शिक्षण देणारें कालेज काढण्यास पुढाऱ्यांना आपली संमति द्यावी लागली. निदान लोकांपुढें उघड रीतीनें तरी याविरुद्ध त्यांना बोलतां येईना; बंगाली लोकांमध्यें शारीरिक व नैतिक धैर्य नाहीं असा पुष्कळ वर्षांचा आक्षेप होता. जें वाङ्मयात्मक शिक्षण आह्मांस मिळे त्यांतही हेच विचार असत. खुद्द बंगाली लोकांचाही असा समज झाला होता कीं, आपण भ्याड, आपले पूर्वज भ्याड आणि आपले वंशजही भ्याडच निपजणार. पण नवीन विचारांच्या लोकांना अशी खात्री उत्पन्न झाली कीं, आपण भ्याडांचें राष्ट्र वीरांचें राष्ट्र करून सोडूं. तरुण, मध्यम वयाचे व वृद्ध असे लोक नव्या चळवळींत सामील झाले. या चळवळीपूर्वी ते भ्याड होते. पुढें त्यांनीं जें कांहीं करून दाखविलें तें करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आहे असें जर एखादा त्या वेळेस ह्मणता तर लोकांनीं त्याला वेडा ठरविला असता. पण अशक्य वाटणारी ही गोष्ट शक्य झाली, व बंगाली तरुणांचें धैर्य किती आहे हें सर्वांच्या निदर्शनास आलें. ज्या युगांतर पत्रावर आतां तिसरा खटला चालला आहे त्या युगांतर पत्राचे हपीसांतील एक तरुण इसम पहिला खटला होण्यापूर्वी मला भेटला होता; तो ह्मणत होता कीं, "हे लोक मला कडक लिहूं देत नाहींत; आणि तुरुंगांत जाण्याची संधि मला मिळत नाहीं." अशा तऱ्हेचें धाडस बंगाली तरुणांमध्यें आतां आलेलें आहे. आपलें राष्ट्र समर्थ आहे अशी लोकांची ठाम कल्पना होणें हेंच या यशाचें बीज आहे. ह्या जोमदार कल्पनेचा उपदेश स्वामी विवेकानंद यांनीं आह्मांला केला. स्वामी विवेकानंदांचे गुरु भगवान् रामकृष्ण परमहंस नेहमीं ह्मणत कीं, स्वतःच्या पापाविषयीं आणि स्वतःच्या निर्बलतेविषयीं एकसारखें रडगाणें गाणारे लोक मला आवडत नाहींत. बायबलामध्यें असली पापाची व निर्बलतेची कल्पना आहे. हीच कल्पना ब्रह्मसमाजानें बायबलापासून घेतली आहे. 'आह्मी पापी'

'आह्मी पापी' असा ध्यास घ्याल तर खरोखरच पापी व्हाल. 'आह्मी पवित्र आहों' 'आह्मी ब्रह्म आहों' असेंच नेहमीं ह्मणत जा; ह्मणजे तुम्ही तसेंच व्हाल. सिंहाचा छावा मेंढरांमध्यें राहूं लागल्यामुळें मेंढरासारखा कसा झाला याची गोष्ट आपल्याला ठाऊक आहेच. पुढें जेव्हां खऱ्या सिंहानें त्यास ओळख करून दिली तेव्हां त्याचा स्वाभिमान जागृत झाला. स्वामी विवेकानंद ह्मणत असत, तुह्मी जसे चिंतीत आलां तसेंच झालां. 'आह्मी ब्रह्म आहों, पराक्रम करण्याचें सामर्थ्य आमच्यांत आहे, आह्मी कोणत्याही राष्ट्रांतील लोकांच्या बरोबरीनें शहाणे व बलिष्ठ आहों असें रात्रंदिवस मनांत वागवाल तर खरोखरच तुह्मी सर्वांत शहाणे, थोर आणि स्वतंत्र व्हाल.' हा मंत्र—ही दिव्य कल्पना—आह्मीं लोकांना शिकविली. कोणत्याही गोष्टींची भीति बाळगूं नका. आपल्या अंतिम हेतूकडे एकसारखी दृष्टि लावा, 'माझ्या देशाला ही गोष्ट पाहिजे आहे काय' एवढेंच काय तें पाहून तसें असल्यास 'मी हें करणार, तें सिद्ध झालेंच पाहिजे व मला कोणीही विघ्न आणूं शकणार नाहीं अशा आत्मनिष्ठेनें एकदम कार्यास लागा.' राष्ट्रीयत्व ह्मणजे काय, तर आपल्या राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीवर दृढ विश्वास असणें हेंच होय. स्वतःच्या व स्वदेशबांधवांच्या कर्तबगारीचा अमर्याद भरंवसा असणें हेंच राष्ट्रीयत्वाचें लक्षण होय. एक नेमस्त गृहस्थ मला आज सकाळीं भेटला होता. त्यानें मला राष्ट्रीय पक्ष व नेमस्त पक्ष यांमध्यें काय फरक आहे ह्मणून विचारलें. तेव्हां मीं त्याला सांगितलें कीं, राष्ट्रीय पक्षाच्या माणसाचा राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीवर दृढ विश्वास असतो, आणि नेमस्ताचा नेमस्त विश्वास असतो किंवा मुळींच नसतो. हें उत्तर अर्थातच त्याला रुचलें नाहीं व तो 'आमचाही राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीवर विश्वास आहे' असें ह्मणूं लागला. तेव्हां मीं त्याला पुन्हां हेंच सांगितलें कीं, तुमचा राष्ट्राच्या कर्तबगारीवर असावा तसा भरंवसा नाहीं, म्हणूनच तुम्ही अजून नेमस्त आहांत; नाहींतर तसे नसतां. तुमच्यापुढें अंधःकार दिसत असतां त्यांत उडी घालण्याची तुमची तयारी असली पाहिजे. दर महिन्यास दर वर्षास तुह्मांवर संकटें येतील. पण त्यांस न जुमानतां उद्दिष्ट हेतूकरितां झगडण्यास तुम्हीं सज्ज झालें पाहिजे. नुसत्या शक्याशक्यतेचा व युक्तायुक्ततेचा विचार करीत बसाल तर तुम्ही निरंतर विचारच करीत रहाल. विद्यार्थ्यांची राष्ट्रीय शिक्षणाची सोय करावयाची असें ठरवून आह्मीं

या कार्यास तावडतोब आरंभ केला व त्यांत यशस्वी झालों. आतां बंगाल्यांतील बहुतेक सर्व जिल्ह्यांत एकेक तरी राष्ट्रीय शाळा आहे. असल्या कामाला प्रथमतः पैसा मिळत नाहीं. पण जीं थोडींशीं माणसें मिळतात त्यांनीं एकत्र होऊन खट-पट केली ह्मणजे वर्गणी जमते. 'करूं कीं नको करूं' अशा प्रकारची संशयी वृत्ति बंगाल्याच्या बाहेरप्रांतीं फार दिसते. यावरून त्यांच्यांत आत्म-निष्ठेची उणीव आहे, कारण त्यांना अजून खरा मार्ग दिसला नाहीं. स्वतः सुर-क्षित रहावें अशी कल्पना हिंदुस्थानांत दृढमूल झालेली आहे. ही कल्पना बाजूला ठेवा आणि देशाला ज्या गोष्टीची अपेक्षा आहे. ती करण्यास पुढें व्हा. वास्तविक पाहिलें तर बंगाल्यापेक्षां इतर प्रांत कांहीं बाबतींत श्रेष्ठ आहेत. तेव्हां जें बंगाली लो-कांनीं केलें तें या प्रांतांतल्या लोकांना सहज करतां आलें पाहिजे. भरंवसा—स्वतः-च्या कर्तबगारीवर दृढ भरंवसा—अत्यंत आवश्यक आहे. हेंच आपणांस सांगावें असें वाटल्यावरून मीं सांगितलें आहे. आमची चळवळ चिरडून टाकण्याकरितां कसेही प्रयत्न करण्यांत आले तरी आम्ही बंगाली लोक आतां भीत नाहीं. जुलूम किंवा दपटशाही सहन करण्याची शक्ति आमच्यांत आली आहे. आम्ही यशस्वी होणार असा आमचा भरंवसा असतो, आणि यशस्वी होण्याच्या प्रयत्नांत आ-मचा सत्यनाश झाला तरी आह्मी फिकीर बाळगीत नाहीं. आमचा मार्ग परमे-श्वरानें दाखविलेला आहे आणि आमच्या प्राप्तव्याकडे आह्मी वेगानें चाललों आहों. आह्मी कशालाही भिणार नाहीं, संकटांना तर आह्मी पाचारण करतों, कारण त्यांमुळेंच आम्हांस अधिक बळ येतें; याच मार्गानें तुह्मी चला असा आह्मां बंगाली लोकांचा इतर प्रांतांतील लोकांना निरोप आहे. हिंदी लोक एक-जुटीनें, एक निश्चयानें आणि एक विचारानें चालूं लागले ह्मणजे त्यांना थांब-विण्याचें सामर्थ्य कशांतही उरणार नाहीं आणि हिंदुस्थान भरभराटीस येऊन श्रेष्ठ व स्वतंत्र होईल.

वंदे मातरंच्या प्रचंड जयघोषांत अरविंद बाबूंचें व्याख्यान संपलें. व्याख्यान चालू असतांना कोणी हूं का चूं केलें नाहीं. त्यांच्या मुखांतून निघणारा प्र-त्येक शब्द आपल्या कानीं पडावा अशी इच्छा प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होती. पुण्यास व्याख्यान चालू असतां इतकी शांतता क्वचितच आढळते. असो, नंतर रा. टिळक व्याख्यात्यांचे आभार मानावयास उभे राहिले. ते ह्मणाले,

पोक्त विचार करीत बसल्यानें भागत नाहीं; तर प्रत्यक्ष पाण्यांतच उडी टा-
कली पाहिजे. योग्य संधि येण्याची वाट पाहून ती येणार नाही, तर आपल्या
कर्तबगारीनें ती उत्पन्न करण्यास तयार झालें पाहिजे. सरकारची दपटशाही
आपणास पुढें जाऊं देत नाहीं; आणि नेमस्त शृंखळा आपणास मागें खें-
चीत आहेत. या दोघांशीं टक्कर देऊन आपणास पुढें जावयाचें आहे. आमच्या
देशाच्या भावी उन्नतीचा काळ खास येणार अशी आमची निष्ठा आहे. अ-
रविंद बाबूंच्या व्याख्यानाचा सारांश हाच आहे. पुन्हां येथें येण्याबद्दल मी
आपल्या तर्फे त्यांना आमंत्रण देतों. अशा आशयाचें भाषण करून रा. टि-
ळकांनीं व्याख्यात्यांचे आभार मानले. नंतर अरविंद बाबूंच्या गळ्यांत, अ-
ध्यक्षांनीं टाळयांच्या गजरांत हार घातल्यावर सभा बरखास्त झाली.

---

### व्याख्यान दुसरें.

## राष्ट्रीय शिक्षण.

[ बुधवार ता. १५ जानेवारी १९०८ रोजीं मुंबईस झालेलें व्याख्यान. ]

राष्ट्रीय शिक्षण हा विषय फार विस्तृत आहे. त्याचा इतका विस्तृतपणा
पहिल्यानें विषय सांगितला तेव्हां माझ्या लक्षांत आला नाहीं; परंतु त्यावर
विचार करूं लागलों तेव्हां तो लक्षांत आला. राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें बोलतांना
येथें ज्या अडचणी आहेत त्या बंगाल्यांत नाहींत. कारण ‘ राष्ट्रीय शिक्षण ’
ह्मणजे आवीं काय, हीच गोष्ट ह्या मुंबई इलाख्यांत पुष्कळांस स्पष्ट रीतीनें
कळलेली नाही. ‘ राष्ट्रीय शिक्षण ’ ह्यांत कांहीं विशिष्ट अर्थ आहे किंवा नाहीं,
ह्याबद्दलच ह्या बाजूच्या कांहीं विद्वान मंडळीच्या मनांत संशय आहे.
राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे काय हें सांगण्याची बंगाल्यांत कांहीं जरुरी नाहीं. राष्ट्रीय





शिक्षणाच्या कोणी विरुद्ध असोत किंवा बाजूचे असोत, परंतु राष्ट्रीय शिक्षण ही प्रत्यक्ष घडलेली व लोकांनीं अनुभव घेतलेली गोष्ट बंगाल्यांत आहे. तें काय आहे ह्याबद्दल आतां कोणाची खात्री करून देण्याचें बंगाल्यांत तरी प्रयोजन नाहीं. तुमच्या मुंबई इलाख्यांत राष्ट्रीय शिक्षण हें अजून शाब्दिक आहे व तें शब्दांच्या पलीकडे गेलें नसल्याकारणानें त्याबद्दल येथील लोकांच्या मनांत संशय आहे. राष्ट्रीय शिक्षण, राष्ट्रीय शिक्षण ह्मणतां तें आहे तरी काय, हेंच मला आधीं समजत नाहीं, असें येथील एका गृहस्थानें त्यासंबंधानें ह्मटलें आहे ! दुसरे ह्मणतात कीं, गणितशास्त्राचा विचार करावयाचा ह्मणजे त्यासंबंधानें राष्ट्रीय शिक्षणाचा अर्थ कसा, हेंच समजत नाहीं ! ना. गोखले ह्यांनीं राष्ट्रीय शिक्षणाचा आपणांस अर्थ समजत नाहीं असें ह्मटलेलें नाहीं, तरी त्यांस तो समजला नाहीं हें त्यांनीं दाखविलें आहे. कलकत्ता येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेंत सर्वानुमतें पास झालेला राष्ट्रीय शिक्षणाचा ठराव सुरतच्या राष्ट्रीय सभेंत आला नाहीं, कारण दुर्दैवानें ती भरली नाहीं. परंतु कलकत्यास पास झालेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या ठरावांत ना० गोखले ह्यांनीं कांहीं फेरफार केलेला आहे व तो फेरफार मुळींच महत्वाचा नाहीं असें त्यांचें ह्मणणें आहे. माझें मत ह्या बाबतींत त्यांच्या मताच्या विरुद्ध आहे. राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें बंगाल्यांत असलेली वस्तुस्थिति ना. गोखले यांस माहीत नसावी. कलकत्ता येथें पास झालेल्या ठरावांत ' राष्ट्रीय ' हा शब्द तीनदां घातलेला आहे व तो हेतुपुरस्सर घातलेला आहे. ना. गोखले यांनीं केलेल्या फेरबदलांत ' शिक्षणाची स्वतंत्र व्यवस्था ' [An independent system of education] असे शब्द घातले आहेत. ह्या शब्दांचे अर्थ पुष्कळ होतील, परंतु आमचा अर्थ ह्यांत कांहीं येत नाहीं. कलकत्ता येथील सब्जेक्ट कमेटीनें ' राष्ट्रीय ' ( National ) हा शब्द ठरावांत तीनदां घातलेला आहे तो कांहीं उगाच नव्हे. राष्ट्रीय शिक्षण राष्ट्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय देखरेखीखालींच द्यावयाचें असा कलकत्ता येथें पास झालेला ठराव आहे व त्यांतील एकही शब्द गाळतां येत नाहीं. ( National Education must be on National lines and und r National control ) ह्यासंबंधानें असा एक प्रश्न विचारण्यांत येतो कीं, आह्मी ' राष्ट्रीय ' हें नांव शिक्षणास कां देतों ? ह्या मंडळींचें ह्मणणें असें आहे कीं, आधीं आमचें राष्ट्रच नाहीं. आह्मांस राष्ट्र ही कल्प-

नेंतील गोष्ट आहे, प्रत्यक्ष नव्हे. हिंदुस्थान देशांत हजारों जाती आहेत, शेंकडों धर्मपंथ आहेत, नानातऱ्हेचीं मतमतांतरें आहेत. तेव्हां ' राष्ट्रीय ' ह्या शब्दाचा उपयोग हिंदुस्थानासंबंधानें करणें ह्मणजे त्यांत कांहीं अर्थच नाहीं. ह्या विचारांच्या लोकांस आधीं राष्ट्र ह्मणजे काय हेंच समजत नाहीं. त्यांचें ह्मणणें काय कीं, निरनिराळ्या जाति व धर्मपंथ नाहींसे कराल तेव्हांच राष्ट्र बनेल. देशांतील सर्व लोक एका धर्माचे व एका जातीचे होतील तेव्हांच राष्ट्र बनेल, हें ह्मणणें खोटें आहे. धर्म, जाति, हीं राष्ट्रीयत्वाला लागणारीं कायमचीं अंगें नव्हत. भूगोलावरून पाहिलें तर हिंदुस्थान हा एक मोठा देश आहे असें ह्मणतां येईल, परंतु त्याला ' राष्ट्र ' ही संज्ञा देतां येणार नाहीं, असें कांहींचें ह्मणणें आहे. परंतु आमचें ह्मणणें असें आहे कीं, भूगोलावरून पाहिलें तरी हिंदुस्थान देश मूळचाच दुसऱ्यांपासून अलग आहे, ही गोष्ट त्याच्या राष्ट्रीयत्वाचें एक अंग आहे. हिंदुस्थानसारखाच मूळचा अलग असा इटली देश तीस वर्षांत स्वतंत्र राष्ट्र बनला. हिंदुस्थानाची अंतर्बाह्य रचना, लोकांची रहाणी, धर्म, वगैरे सर्वच इतर जगापासून भिन्न आहेत व तीं फार प्राचीन कालापासून आहेत. आक्षेपकांचें ह्मणणें असें आहे कीं, हिंदुस्थान हा कधीं राष्ट्रच नव्हता. तेव्हां राष्ट्र ह्मणजे काय याचा आधीं विचार करूं. राष्ट्रीय पद्धतीनें शिक्षण द्या, असें जेव्हां आह्मी ह्मणतों तेव्हां मागील सर्व झुगारून देऊन अगदीं नवीन पद्धतीनें शिक्षण द्या, असें आह्मी ह्मणत नाहीं. आमच्या देशाचा मागील इतिहास पाहिला तर स्वतंत्र असें राष्ट्रीय शिक्षण आमच्याकडे होतें, असें आढळून येईल. आमच्या तत्वज्ञानाकडे पाहिलें तरी पिंड व ब्रह्मांड व जें पिंडीं तें ब्रह्मांडीं असें सांगितलेलें दिसेल. अर्थात राष्ट्र ही सचेतन, जिवंत अशी वस्तु आहे; तुम्ही बनवून झालेली राष्ट्र ही कांहीं वस्तु नव्हे. तिची वाढ ही झालीच पाहिजे; व ती उन्नतावस्थेप्रत पोंचलीही पाहिजे. मग ती हजार वर्षांत पोंचो वा वीस वर्षांत पोंचो. माणसाचे जसे स्थूल, सूक्ष्म व कारण असे तीन देह आहेत, तसेच ते राष्ट्राचेही आहेत. आमच्या तत्वज्ञानाप्रमाणें चर्मचक्षूंनीं दिसणाऱ्या नुसत्या स्थूल देहाचें वर्णन केल्यानें माणूस समग्र जाणला जात नाहीं. तर त्याच्या तिन्ही देहांचा विचार करावा लागतो, व तेव्हांच माणसासंबंधानें पुरें ज्ञान होतें. जशी माणसाची तशीच राष्ट्राची गोष्ट होय. आपल्या राष्ट्राचा विचार करावयाचा ह्मणजे प्रथम आपल्या मातृभूमीचा विचार

करावयाचा. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत ज्याचा विस्तार, पूर्व पश्चिम समुद्रांनीं ठरविलेली ज्याची सीमा, ज्यांत गंगा, यमुना, नर्मदा, कृष्णा, गोदावरी, वगैरे नद्या वहात आहेत, प्राचीन शहरें आहेत, उंच उंच घुमटांचीं देवालयें आहेत, रमणीय वाडे आहेत, असा पृथ्वीचा भाग ज्याला आज हिंदुस्थान म्हणतात तो, आमचें राष्ट्र म्हटल्याबरोबर आम्हांपुढें उभा रहातो. व हेंच आमच्या राष्ट्राचें स्थूल शरीर होय. बाबू बंकिमचंद्र ह्यांनीं रचलेलें 'वंदे मातरम्' हें आमच्या राष्ट्राच्या स्थूल शरीराचें वर्णन होय. हिंदुस्थानांत वास करीत असलेल्या तेहतीस कोटी लोकांचीं सुखदु:खें, त्यांच्या बऱ्या वाईट वासना, वगैरेंचा समावेश राष्ट्राच्या सूक्ष्म शरीरांत होतो. वर नमूद केलेल्या शरीरांत कालमानानें नाना तऱ्हेचे फेरबदल झाले तरी बीजरूपानें अविनाशी असा कायमचा अणु असतो व तो सर्वांचें आदिकरण असल्यानें त्यांतूनच भावी गोष्टी घडून येतात; व त्याप्रमाणें भावी राष्ट्र बनतें. हें राष्ट्राचें कारण शरीर होय. परंतु इतक्यानेंच भागत नाहीं. माणसाची कल्पना करतांना आमच्या शास्त्रांत नुसत्या वर्तमानाचाच नव्हे तर भूत व भविष्याचाही विचार करण्यांत येतो. हीच गोष्ट राष्ट्रालाही लागू पडते. आपण नद्या, पर्वत, शहरें, वगैरेंचा उच्चार करितों तेव्हां वर्तमानकाळापुरताच देशाचा विचार करतों काय ? नव्हे. तर पांच हजार वर्षांचा इतिहास बोलत असतों. दिल्ली व आग्रा ह्या शहरांचा उच्चार करतों तेव्हां अकबर बादशहाचें दिल्ली शहर आपणांपुढें उभें रहात नाहीं काय ? तेव्हां आज राष्ट्राचा विचार करतांना मागील माणसांबद्दलचा विचार आपणापुढें आला पाहिजे. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे शिवाजी, अशोक व अकबर हेही आजच्या हिंदी राष्ट्राचे घटकावयव आहेत, हें समजेल. त्याचप्रमाणें प्राचीन ऋषीही होत. जपानकडे पाहिलें तर आपणांस असें आढळून येईल कीं, जपानी लोकांचें लक्ष त्यांच्या पूर्वजांकडे फार असतें. आपल्या शत्रूशीं निकराची लढाई करणाऱ्या जपानी वीराला जपान देशासाठीं ज्यांनीं आपल्या प्राणांच्या आहुती दिल्या अशा त्यांच्या पूर्वजांची पुरी माहिती असे. पूर्वजांचा सन्मान कसा करावयाचा व त्यांची आठवण करून राष्ट्रीयत्वाची जागृति कशी करावयाची हें जपानापासून शिका. जें जें म्हणून तुम्ही आज करतां तें तुमच्यासाठीं नसून पितरांच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं करतां हें लक्षांत बाळगा. तुमचे पूर्वजच नव्हेत तर तुमची भावी प्रजाही तुमच्या

राष्ट्राची घटकावयव होय. हिंदी राष्ट्राचा विचार करावयाचा तो अशा दृष्टीनें केला पाहिजे. पाश्चिमात्य सुधारणेला केवळ भुरळून जाण्यांत अर्थ नाहीं. अशा व्यापक व उदार दृष्टीनें आपण आपल्या राष्ट्राचा व राष्ट्रीयत्वाचा विचार केला व कामाला लागलों ह्मणजे त्याच्या योगानें मोठेमोठे तत्ववेत्ते, थोर मुत्सद्दी, बडे लढवय्ये, सेना नायक—आज मी ह्मणत नाहीं,—आपल्या राष्ट्रांत उत्पन्न होतील. राष्ट्र हा शब्द अर्थपूर्ण आहे, राजकीय सोयीचा हा शब्द नव्हे. बंगाल्यांत राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें विचार करतांना आम्हीं राष्ट्रसंबंधाची ही उदार कल्पना पुढें ठेवलेली आहे. ह्या उदार कल्पनेला धरून आह्मीं राष्ट्रीय शिक्षणाचा उपक्रम कसा केला आहे तें पाहूं. आपण सर्वांत सोपा असा भूगोल विषयच घेऊं. आजच्या शिक्षणपद्धतीप्रमाणें सरकारी व खाजगी शाळांतून भूगोल हा विषय कसा शिकविला जातो तो पहा. अमका अमका देश, त्याचे निरनिराळे परगणे, त्या परगण्यांतील डिस्ट्रिक्ट ऑफिसर, वगैरेंची माहिती भूगोलांत शिकवितात; पण तिचा उपयोग काय? बंगाल्यांत आह्मी राष्ट्रीय पद्धतीनें शिक्षण देतों त्यांत भूगोल शिकवितों तो निराळ्या तऱ्हेनें शिकवितों. भूगोल शिकवितांना पहिली गोष्ट आह्मी मुलांना सांगतों ती ही कीं, हिंदुस्थान ही आपली मातृभूमि होय. अशा रीतीनें आपल्या राष्ट्राचें स्थूल शरीर काय तें आह्मी मुलांस प्रथम सांगतों. गंगा, यमुना, नर्मदा, वगैरे काय आहेत तें भूगोल शिकवितांना आह्मी सांगतों, कोठें आहेत तें सांगत नाहीं. महाराष्ट्राचें वर्णन करीत असतां बंगाल्यांतील राष्ट्रीय शाळांतून आह्मी शिवाजीमहाराजांचा अवतार ज्या महाराष्ट्रांत झाला तो महाराष्ट्र काय हें शिकवितों. पंजाबासंबंधानें बोलतांना रणजितसिंगाचा पंजाब आह्मी मुलांना सांगतों. हिमालयाची माहिती सांगतांना ऋषींच्या वास्तव्यानें पवित्र झालेल्या हिमालयाचा भूगोल आह्मी राष्ट्रीय शाळांतील विद्यार्थ्यांस शिकवितों. दुसऱ्या देशाचाही भूगोल आह्मी शिकवितों; परंतु स्वदेशाशीं त्या देशाचा संबंध काय आहे, इतकीच माहिती आह्मी विद्यार्थ्यांस सांगतों. भूगोलाप्रमाणें इतिहास हा विषयही बंगाल्यांत आह्मी राष्ट्रीय पद्धतीनें शिकवितों. किती राजांनीं राज्य केलें, ते गादीवर आले कधीं, गेले कधीं, प्लासीची लढाई कोणत्या तारखेला झाली, वगैरे गोष्टींकडे इतिहास शिकवितांना, आम्ही विशेष लक्ष देत नाहीं. प्राचीनकाळीं हें आमचें आर्य राष्ट्र कसें

बनलें, मराठे हे आजचे मराठे केव्हां झाले, तसेंच बंगाली व पंजाबी कसे झाले, हें आम्ही इतिहास शिकवितांना सांगतों. विद्यार्थ्यांना ह्या सर्व गोष्टी नीट समजल्या म्हणजे प्लासीची लढाई कोणत्या वर्षी झाली हें सांगतां आलें नाहीं तरी चालेल. सारांश, आमच्या इतिहासाचा खरा भाग शिकविण्यास हल्लींच्या सरकारी शिक्षणपद्धतीनें अजून सुरवातही झाली नाहीं ह्मटलें तरी चालेल. भूगोल व इतिहास ह्यांच्याप्रमाणेंच बंगाल्यांतील राष्ट्रीय शाळांतून तत्वज्ञानाचा विषयही आम्ही राष्ट्रीय पद्धतीनेंच शिकवितों. सर्व जगांतील तत्वज्ञानापेक्षां आमचें तत्वज्ञान श्रेष्ठ आहे, हें आम्ही नॅशनल कॉलेजांतील विद्यार्थ्यांस समजावून सांगतों. सरकारी पद्धतीनें शिकलेले पदवीधर तत्वज्ञानासंबंधानें बोलतांना शोपेनहोर काय ह्मणतो तें सांगतात, परंतु स्वतःचें शास्त्र कांहीं त्यांस माहीत नसतें. तात्पर्य, कॉलेजांतून व नंतर जें जें तत्वज्ञान विद्यार्थी शिकतील तें तें आपल्या आचरणांत आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला पाहिजे.

राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे एखादी अगदीं नवीन गोष्ट आह्मी सुरू करतों असें नाहीं. त्याची सुरवात आमच्या पूर्वजांनींच करून ठेवली आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या योगानें शिवाजी महाराजांची थोरवी कायम राहील. अशोकाचा मोठेपणा व अकबराची कीर्ति दिगंतरीं दुमदुमत राहील. प्राचीन ऋषींचें वैभव सर्व जगाच्या निदर्शनास येईल. जी जी ह्मणून उपयोगाची व महत्त्वाची गोष्ट आहे तिचा अव्हेर राष्ट्रीय शिक्षणांत आह्मी करीत नाहीं. अशा रीतीचें राष्ट्रीय शिक्षण सरकारी शाळांतून मिळत नाहीं. सरकारी शाळांतून पुष्कळ युरोपियन विचारांचें ओझें आमच्या विद्यार्थ्यांच्या कोंवळ्या मनावर लादलें जातें. युरोपियन आचारविचार व एकंदर युरोपियन रहाणी आमच्या आचारविचारांहून अगदीं भिन्न आहेत. आतां इतकें खरें कीं, प्राचीन व अर्वाचीन सुधारणेचा विचार करीत असतां हल्लींच्या युरोपियन सुधारणेचा विचार आपणांस अजीबात बाजूला ठेवतां यावयाचा नाहीं. आमची सुधारणा आह्मी करीत असतां पाश्चिमात्य सुधारणेंतील ग्राह्य तितक्या गोष्टी आपणास घेतल्याच पाहिजेत. परंतु त्यामुळें आपल्या मूळांना धक्का बसणार नाहीं इतकी खबरदारी घेतली ह्मणजे बस्स झालें. जपानाप्रमाणें पाश्चिमात्य सायन्सचा आपण उपयोग करून घेणें जरूर आहे, परंतु तें काम करीत असतां आपल्या पूर्वजांचे कृतीकडे अजीबात डोळेझांक

करणें बरोबर होणार नाहीं. उदाहरणार्थ, सरकारी पद्धतीप्रमाणें मेडिकल कॉलेजांतून शिकणाऱ्या व शिकलेल्या विद्यार्थ्यांनीं आमची आयुर्वेदिक पद्धत विसरतां कामा नये. आयुर्वेदिक पद्धतींत पुष्कळ गूढ परंतु उपयोगी गोष्टी आहेत, त्या पाश्चिमात्य पद्धतींत नाहींत. तरी पण आमचें तेवढें सर्वच चांगलें असें आपणांस ह्मणतां यावयाचें नाहीं. राजकीय गोष्टींसंबंधानें विचार करावयाचा ह्मणजे आह्मांस पाश्चिमात्यांपासून बरेंच शिकावें लागेल. लोकनियंत्रित राज्यसत्तेची पद्धत आह्मांस युरोपियन लोकांपासून शिकली पाहिजे. राष्ट्रीय शिक्षण देत असतां राजकीय गोष्टींपासून आह्मी विद्यार्थ्यांस अलिप्त ठेवीत नाहीं, इतकेंच नव्हे तर प्रजासत्ताक राज्यपद्धति काय आहे हें आह्मी त्यांस अनुभवानें आमच्या बरोबर कामाला घेऊन शिकवितों. उद्योगधंद्याकडे व नुसत्या व्यापाराकडेच विद्यार्थ्यांनीं लक्ष घालावें असें आह्मी त्यांस सांगत नाहीं. नुसत्या व्यापारानेंच राष्ट्र उदयास येईल हें ह्मणणें खोटें आहे. इतिहास पाहिला तर असा नाहीं. नुसत्या व्यापारावर वाढलेलीं राष्ट्रें फार दिवस टिकलीं नाहींत. देशांतील उद्योगधंदा व व्यापार ह्यांची मांडणी कोणत्या धोरणानें करावयाची याकडे युरोपांत विशेष लक्ष देत असतात. आमच्या राष्ट्रीय पद्धतीनें शिक्षण देतांना आह्मी विद्यार्थ्यांस वस्तुस्थितीचें ज्ञान करून देतों. ह्मणून आमच्या शाळेंतील विद्यार्थी शास्त्र काय आहे तें शिकतो, शास्त्राविषयीं शिकत नाहीं. सुतार, लोहार, वगैरेंचीं हातचीं कामें करण्यासही आह्मी शिकवितों; व त्यामुळें आमच्या कॉलेजांतून अगर शाळेंतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांस दरमहा पंचवीस तीस रुपये मिळण्यास आज हरकत पडत नाहीं. सरकारी पद्धतीनें शिकलेल्या विद्यार्थ्यांस दरमहा पंधरा रुपयेही मिळण्याची पंचाईत पडते. राष्ट्रीय पद्धतीनें राष्ट्रीय शिक्षण देतांना आमचें लक्ष भावी हिंदी राष्ट्र बनत आहे ह्याकडे विशेष असतें. राष्ट्रीय शिक्षणाचा विचार करीत असतांना निरनिराळ्या शिक्षणपद्धतींच्या सर्व बाजूंचा विचार करावा लागतो. प्रि० परांजपे ह्मणतात त्याप्रमाणें नुसत्या गणिताची गोष्ट घेऊन चालणार नाहीं. हें हिंदी राष्ट्र इतर राष्ट्रांच्या बरोबरीचें मोठें केव्हां होईल हा विचार राष्ट्रीय शिक्षण देण्यांत असतो. आमचीं मोठीं माणसें इतर देशांतील मोठ्या माणसांच्या तोडीचीं कशीं होतील हा विचार आमचा सतत असतो. आमच्या शाळांतून पांचव्या इयत्तेपर्यंत आह्मी मुलांस

व्हर्सिटीच्या इंटरमिजीएटच्या बरोबरीची आहे. आमच्या कॉलेजांतील अभ्यासक्रम चार वर्षांचा आहे. कॉलेजांत विद्यार्थ्यांस एकाच विषयाचें अध्ययन करावयाचें असून तेथें इंग्रजी भाषेचा उपयोग विशेष केला जातो. तरी पण राष्ट्रीय पद्धतीच्या आमच्या शिक्षणक्रमांत इंग्रजीला अग्रस्थान दिलेलें नसून ती दुसरी भाषा ह्मणून विद्यार्थ्यांस शिकविण्यांत येते. विद्यार्थ्यांनीं आपल्या पायांवर उभें राहून चाललें पाहिजे, त्यांस कोणी उचलून नेणार नाहीं, हें आमच्या राष्ट्रीय शिक्षणाचें धोरण होय. प्रत्येकानें आपल्या स्वतःच्या पायावर उभें रहाण्यास शिकावें, दुसऱ्याचे तोंडाकडे पाहूं नये, असें स्वावलंबनाचें तत्व शिकविण्याकडे आमचा विशेष कटाक्ष असतो. अशा रीतीनें आह्मी बंगाल्यांत काम करीत आहों. ह्या कामीं आह्मांस सरकारच्या मदतीची अपेक्षा नाहीं. सरकारी मदतीच्या योगानें आमच्यामध्यें असलेला राष्ट्रीय जोम नाहींसा होईल. राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें आह्मी काय ह्मणतों हें ना. गोखले यांस आतां समजेल. सुरत शहरीं भरणाऱ्या कांग्रेसच्या बैठकींत राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें स्वतंत्र ठराव कां हवा होता तें आतां स्पष्ट होईल. बंगाल्यांत आह्मीं काय केलें तें आपणापुढें ठेवलें आहे. आह्मीं काय केलें तें तुम्हांस पहावयाचें असेल तर या आणि पहा. राष्ट्रीय शिक्षण ही एक अशक्य गोष्ट आहे, असें म्हणणारांस आह्मी आव्हान करून सांगतों कीं, बंगाल्यांत आह्मीं ती शक्य करून ठेवली आहे. या आणि आपली खात्री करून घ्या. राष्ट्रीय शिक्षण राष्ट्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय देखरेखीखालीं आह्मीं बंगाल्यांत सुरू केलेलें आहे. ह्या कामीं आम्हांस तीन जमीनदारांनीं चांगली मदत केलेली आहे. राजा सुबोधचंद्र मालिक यांनीं एक लाख रुपये, मैमनसिंगचे महाराज यांनीं तीन लाख, गोरखपूर येथील जमीनदार यांनीं पांच लाख अशा रकमा दिलेल्या असून राष्ट्रीय शिक्षणास सरकाराकडून एक पै घेतली तर आह्मी आपले सर्व पैसे परत घेऊं, अशा अटीवर त्यांनीं मदत केली आहे. कारण शिक्षणाच्या बाबतींत सरकार जो पैसा खर्च करते तो लोकांमध्यें एक वि-

बांचा इतिहास सांगितला व तो सांगतांना बंगाली विद्यार्थी प्रथम बहिष्कारासंबद्दल कशी चळवळ करीत होते, ती चळवळ करीत असतां त्यांस शाळेंतून कसें काढलें, सर्क्युलरें कशीं निघालीं, त्यानंतर राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या शाळा रंगपूर, डाका, किशोरगंज, कोमिला, वगैरे ठिकाणीं कशा सुरू झाल्या, बाबू बिपिनचंद्र पाल ह्यांच्या भाषणांनंतर त्या त्या ठिकाणीं मूठभर तांदुळाची घरोघर भिक्षा मागून कशी मदत झाली, युनिव्हर्सिटीलाही बहिष्कार घालण्याचा मंडळीचा कसा विचार होता, परंतु ठरीव अशा बंगाली पुढाऱ्यांचा ह्या प्रयत्नाबद्दल अविश्वास असल्यामुळें तें काम लांबणीवर कसें पडलें आहे, वगैरे गोष्टी त्यांनीं सांगितल्या. ह्या हकीकतीशिवाय आपल्या भाषणाच्या उपसंहारांत बाबूसाहेबांनीं राष्ट्रीय शिक्षणास राष्ट्रीय देखरेखीची व व्यवस्थेची जरूर काय, राष्ट्रीय देखरेख (National Control) ह्याचा अर्थ तरी काय, वगैरे प्रश्नांचा थोडक्यांत विचार करून प्रो० सीलीच्या शब्दांनीं स्पष्ट सांगितलें कीं, राष्ट्रीय (National) व सरकारी (State) हे दोन शब्द अगदीं भिन्न असून हल्लीं सरकारी धोरणानें व मदतीनें आम्हांस शिक्षण मिळत आहे, परंतु तें कांहीं राष्ट्रीय नव्हे, इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय शिक्षणाच्या तें उलटच आहे. सरकारी मदतीनें तयार झालेलीं माणसें सरकारच्याच उपयोगाचीं आहेत. म्हणून सरकारी मदतही आम्हांस नको व तें धोरणही आम्हांस पसंत नाहीं, असें सांगून बाबू अरविंद घोस ह्यांनीं आपलें भाषण आटोपलें. सुमारें सवा तासावर त्यांचें सावकाश व विचारानें पूर्ण असें भाषण चाललें असतां हजारों श्रोत्यांनीं विलक्षण शांत रीतीनें इतका वेळ समग्र ऐकून घेतलें.



## व्याख्यान तिसरें.

# सांप्रतची परिस्थिति.

( तारीख १९ जानेवारी १९०८ रोजीं मुंबईस महाजनवाडींत श्रीयुत अरविंद घोस यांनीं दिलेलें व्याख्यान ).

देशबांधवहो, आज परमेश्वर अध्यक्ष आहे अशी अंतःकरणापासून भावना करून आणि तो जगचालक मला प्रेरणा करो अशी प्रार्थना करून मी भाषणास आरंभ करितों. " सांप्रतची परिस्थिति व तिचे उपाय " या विषयावर भाषण करण्यास मला सांगण्यांत आलें. सांप्रतची परिस्थिति काय आहे ? आपल्या देशाची आज काय परिस्थिति आहे ? व्याख्यानाकरितां येण्यास मी निघालों इतक्यांत हें पत्र ( वंदेमातरं पत्राचा अंक दाखवून ) माझ्या हातांत आलें त्याच्या पाहिल्याच पानावर या दोन बातम्या आहेत--एक " युगांतर खटल्याचा निकाल-प्रिंटर दोषी ठरून दोन वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली; " आणि दुसरी बातमी " नवशक्ति आफिसाचा झाडा घेतला. प्रिंटर १०००० च्या जामीनावर खुला आहे. " देशाची आजची परिस्थिति ही आहे. मी काय ह्मटतों हें आपल्या पूर्णपणें ध्यानांत आलें काय ? हिंदुस्थानांत सध्यां एक धर्म निर्माण झाला आहे त्याचें नांव राष्ट्रीयत्व. हा धर्म बंगाल प्रांतांतून इकडे आला आहे. या धर्माचा अंगीकार तुमच्यापैकीं पुष्कळांनीं केला आहे; तुह्मी आपणांस राष्ट्रीय पक्षाचे ह्मणवितां. ' राष्ट्रीयत्व ' ह्मणजे काय याची तुह्मांला ओळख पटली आहे काय ? तुह्मीं कशाचा अंगीकार केला तें तुह्मांस ठाऊक आहे काय ? तुमच्या बुद्धीस हें बरोबर दिसतें ह्मणूनच केवळ याचा अंगीकार केलात काय ? तुह्मीं स्वतःला राष्ट्रीय पक्षाचे ह्मणवतां. राष्ट्रीयत्व ह्मणजे तरी काय ? राष्ट्रीयत्व ह्मणजे कांहीं नुसती राजकीय कामाची पद्धत नव्हे. राष्ट्रीयत्व हा ईश्वरप्रणीत धर्म आहे. ह्या धर्मामध्यें तुह्मांला राहिलें पाहिजे. पोकळ नांवासाठीं राष्ट्रीय पक्षाला मिळूं नका. मी राष्ट्रीय पक्षाचा आहें' असें सांगितल्यानें आपण देशाभिमानी आहों व सांगत नसतील त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ आहों असें बिलकूल मानूं नका. राष्ट्रीय पक्षास मिळावयाचें असेल, जर हा राष्ट्रीयत्वाचा धर्म तुह्मांस संमत असेल, तर भाविक अंतःकरणानेंच तुह्मीं आलें पाहिजे. आपल्या देशाचा उद्धार घडवून आणण्यासाठीं परमे-

श्वरानें आपणांस निमित्त मात्र केलें आहे हें तुह्मीं लक्षांत ठेवलें पाहिजे. कर्ता-करावता परमेश्वर आहे, आपण केवळ निमित्त आहोंत ह्याच बुद्धीनें आपण मरेपर्यंत वागलें पाहिजे. बंगालमध्यें काय प्रकार घडून आला ? तुह्मी आपल्याला राष्ट्रीय पक्षाचे ह्मणवितां पण असा प्रकार घडून आल्यावर तुह्मी काय कराल ? बंगालमध्यें ह्या आतां रोजच्या गोष्टी झाल्या आहेत, कारण राष्ट्रीयत्व हा एक धर्मच आहे असें बंगाली समजतात व तशा दृष्टीनेंच त्यांनीं तो स्वीकारला आहे. ह्या धर्माला प्रतिकूळ अशा कांहीं गोष्टी आहेत व त्या त्याचें वाढत चाललेलें सामर्थ्य चिरडून टाकण्याच्या प्रयत्नांत आहेत. जेव्हां लोकांमध्यें एखादा नवा धर्म प्रसृत होऊं लागतो,—जेव्हां लोकांमध्यें ईश्वरी शक्ति उत्पन्न होऊं लागते, तेव्हां तिला चिरडण्यास अशा हजारों प्रतिकूल गोष्टी उत्पन्न होतात. बंगाल-मध्यें असा नवीन धर्म—दिव्य आणि सात्विक धर्म—उत्पन्न झाला असून तो नाहींसा करण्याचेही नानाविध प्रयत्न सुरू आहेत. अशा कोणच्या सामर्थ्याच्या जोरावर आह्मी या विघ्नांतून जिवंत राहिलों आहोंत ? राष्ट्रीयत्व चिरडलें गेलें नाहीं, तें कधींही चिरडलें जाणार नाहीं. परमेश्वराचा त्याला आधार आहे व कसेही प्रयत्न झाले तरी तें नाहींसें होणार नाहीं. राष्ट्रीयत्व अमर आहे, तें कधींही मरणार नाहीं; कारण ती कांहीं मानवी वस्तु नव्हे. बंगाल्यांत जें कार्य चाललें आहे तें प्रत्यक्ष ईश्वर करीत आहे. ईश्वराला तर कोणी मारूं शकत नाहीं ? त्याला तर कोणी तुरुंगांत टाकीत नाहीं ? असे प्रकार तुमच्याकड होतील तेव्हां तुह्मी काय कराल ? मी खरोखरच विचारतों, तुह्मी काय कराल ? बंगाली लोक वागतात तसेच तुह्मी वागाल काय ? ( होय. होय. ) उगाच होय ह्मणूं नका. ही गोष्ट थट्टेची नव्हे. ईश्वरच तुह्मांला हा प्रश्न करितो आहे असें समजा. तुह्मी ईश्वराच्या या प्रश्नास काय उत्तर द्याल ? तुह्मी काय ह्मणतां यावर तुमची श्रद्धा आहे काय ? कीं ही नुसती राजकीय महत्वाकांक्षा आहे ? अथवा केवळ मोठ्या प्रमाणावरचा स्वार्थ आहे ? का तुह्मांला असें वाटतें आहे कीं सध्यां आपल्यावर जसा जुलूम चालला आहे तसा आपण पुढें दुसऱ्या राष्ट्रावर करूं ? यापेक्षां उदात्त हेतूनेंच तुह्मी या राजकीय पंथाचे अनुयायी बनला आहां काय ? तुमच्यामध्यें ईश्वर संचारला आहे काय ? आपलीं शरीरें देखील आपल्या स्वाधीन नाहींत—आपण परमेश्वराचे केवळ निमित्त मात्र आहोंत अशी तुमची

श्रद्धा बसली आहे काय? परमेश्वर सर्व कार्य करीत आहे, तुह्मी केवळ निमित्त आहांत असा भरंवसा तुह्मांला आला आहे काय? आला असेल तरच तुह्मी राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी आहां असें ह्मणतां येईल; तरच या राष्ट्राचा उद्धार तुह्मांला करतां येईल. बंगाली लोकांना--कोणाला कमी असेल कोणाला अधिक असेल--ही श्रद्धा उत्पन्न झाली आहे, आणि हीच श्रद्धा तुमच्यामध्यें उत्पन्न झाली पाहिजे. ह्मणजे मग आपल्या कार्यास ईश्वराचा आशीर्वाद मिळेल, आपलें राष्ट्र पुनरपि उदयास येईल आणि प्राचीन काळीं जी धार्मिक उन्नति झाली होती त्या उन्नतीप्रत पुन्हां जाऊन पोंचेल. ( टाळ्या ). भरतखंडाचा ज्ञानदीप नाहींसा होऊं नये, भरतखंडाचा आत्मा मरूं नये, ह्मणून हें कार्य करण्यासाठीं ईश्वरानें तुह्मांला निमित्त केलें आहे. बंगालमध्यें काय झालें तें मी तुह्मांला सांगतों. यापूर्वी बंगाल प्रांत कसा होता तुह्मांला ठाऊक आहे. पूर्वी 'बंगाली' हा एक प्रकारचा अपशब्द होता. लोक जेव्हां बंगालचें नांव काढीत तेव्हां त्यांना काय वाटत असे? आदर वाटत असे काय? प्रेम वाटत असे काय? इतर देशांतले लोक बंगाल्यांना काय ह्मणत होते तें आपणांस ठाऊक आहेच. पण आज तुह्मांला तसें वाटतें काय? पूर्वी जर कोणीं तुह्मांला सांगितलें असतें कीं बंगाल प्रांत हिंदुस्थानचा त्राता होईल तर तुह्मीं त्यावर काडीइतका तरी विश्वास ठेवला असता काय? तुह्मीं हें साफ अशक्य ह्मणून ह्मटलें असतें. हिंदुस्थानचा तारक बंगाल होणार नाहीं; महाराष्ट्र होईल; पंजाब होईल; पण बंगाल कधींही होणार नाहीं; ही कल्पना शुद्ध वेडेपणाची आहे. परंतु, त्या वेळेपासून अलीकडे काय झालें आहे? हा इतका फरक कशानें पडला? पूर्वींचा बंगाली आतां इतका निराळा कसा बनला? बंगालमध्यें एक गोष्ट झाली, व ती ही कीं, बंगालला स्वतःचा भरंवसा वाटूं लागला. युरोपियन सुधारणारूपी मदिरेचें पान बंगालनें आरंभीं यथेष्ट केलें. पाश्चात्य देशांतल्या बुद्धिविषयक शिक्षणाचा केवळ त्यानें स्वीकार केला. सर्व वस्तूंकडे पहाण्यास आणि त्यांवर अभिप्राय देण्यास साधन काय ती एक बुद्धि. पण बुद्धि हें अपुरें साधन आहे. यामुळें जो बंगाल प्रांत पूर्वी देवनिष्ठ होता तो शंकेखोर व नैराश्यवादी बनला. पण हा दोष असतांही बंगाली लोकांत एक प्रकारचा जोम होता. बंगाल्याची ज्यावर निष्ठा बसेल---पुष्कळांची बसत नाहीं---पण ज्याची बसेल तो त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृति करील, तो ब्रह्मसमाजिस्ट असेल, सामाजिक

सुधारक असेल, पण त्याचें जें मत असेल त्याबरहुकूम तो वागेल; मग त्याचे विचार चुकीचे असोत अगर बरोबर असोत. अमुक एक गोष्ट आपल्या देशाच्या उद्धारार्थ जरूर आहे, अमुक एक गोष्ट सत्य आहे व तीप्रमाणें आचरण केलें पाहिजे, असें एकदां त्याच्या मनानें घेतलें ह्मणजे मग तो त्याबद्दल निरर्थक काथ्याकूट करीत बसणार नाहीं. ती गोष्ट केवळ मनोराज्य आहे, आपण ती प्रत्यक्ष कृतींत उतरावी किंवा नुसती मान्य करून कृति करूं नये, इत्यादि विचार करीत न बसतां, काय होईल तें होवो तीप्रमाणें आचरण केल्यावांचून तो कधींही रहावयाचा नाहीं. कोणी एखादा ब्रह्मसमाजिस्ट नसेल सनातनधर्मी असेल, पण आपल्या मतांकरितां जिव्हाळ्याच्या परंतु भिन्न विचारांच्या माणसास तो दूर टाकून देईल. बऱ्यावाईट परिणामांचा विचार न करितां जें यथार्थ वाटतें त्याप्रमाणें तो हटकून आचरण करील. बरें, बंगाली राष्ट्रामध्यें मोठा गुण असा कोणता ? तर आतां सांगितल्याप्रमाणें बंगाल्यांची कशाना कशावर तरी निष्ठा असते. निष्ठा केवळ बुद्धिविषयक नसते, केवळ मानसिकही नसते, आपल्या अंतःकरणांतही नाहीं अशी ती कांहीं अपूर्व वस्तु आहे; ती दैवी प्रेरणेनें उत्पन्न होत असते; जशी निष्ठा असेल तसें वागणें तुमचें कर्तव्य आहे. परमेश्वर अंतःकरणें वेधून टाकतो, अंतःकरणांत तो वास करतो. यामुळें बंगाल्यांचा बचाव झाला. अशी निष्ठा आमच्यामध्यें होती ह्मणून ईश्वरानें आह्मांस हिंदुस्थानचे संरक्षक ह्मणून पुढें आणलें, आह्मांस अघाडीस ठेवलें, आमच्या निष्ठेकरितां हालअपेष्टा सोसण्यास भाग पाडलें, आपला पाठिराखा ईश्वर आहे या भरंवशावर वाटेल ती गोष्ट करण्यास आह्मीं कां कूं केलें नाहीं. अशा लोकांचें राजकीय सामर्थ्य मोठें नसलें तरी चालेल, ते शक्तिवान् नसले तरी चालतील, ते सर्वांत श्रेष्ठ बुद्धिमत्तेचे नसले तरी चालतील. फक्त ते निष्ठावान् श्रद्धावान् असले ह्मणजे झालें. बंगालमध्यें कांहीं वर्षांमागें विलक्षण धार्मिक प्रगति घडून आली. कांहीं साधुपुरुष निर्माण झाले; जर बंगाल्यांच्या अंतःकरणांत आतां सांगितलेली श्रद्धा नसती तर सुशिक्षितांनीं या साधुपुरुषांस मुळींच ओळखलें नसतें. पण या श्रद्धेमुळें परमेश्वरानें त्यांचे डोळे उघडले आणि पाश्चात्य शिक्षण ज्यांना कःपदार्थ मानील अशा पुरुषांकडे सर्वांचें लक्ष लागलें. या साधुपुरुषांपैकीं एकाचें समाजावर सर्वांत जास्त वजन होतें, बंगालचा उद्धार करण्याकरितां त्यानें सर्वांत जास्त श्रम केले, पण त्याला लिहिण्यावाचण्याचा गंध

देखील नव्हता. सामान्य लोकांच्या दृष्टीनें जगाला तो अगदीं निरुपयोगी मनुष्य होता. पण त्याच्यामध्यें एक दिव्य शक्ति होती, ती ही कीं, त्याची श्रद्धा विलक्षण असून त्याला ईश्वराचा साक्षात्कार झाला होता. लोकांना त्याची वागणूक वेडया माणसासारखी दिसेल. त्याच्या बुद्धीला शिक्षण मिळालें नव्हतें, बाहेरून पहाणाराला त्याच्या बुध्दीला संस्कार झालेला नव्हता. तो भिक्षावृत्तीनें आपली उपजीविका करीत असे. इंग्रजी शिक्षण मिळालेल्या मनुष्याच्या दृष्टीनें तो समाजाला अगदीं कंटकरूपी नसला तरी निरुपयोगी होय. इंग्रजी शिक्षण मिळालेला मनुष्य त्याला अडाणी म्हणेल. त्याला काय कळतें? पाश्चात्य शिक्षणानें परिपूर्ण झालेल्या माझ्यासारख्या माणसाला तो काय शिकवील? परंतु तो मनुष्य काय उद्योग करीत होता हें परमेश्वराला ठाऊक होतें. त्याला ईश्वरानें बंगाल्यांत धाडून दिलें. तो कलकत्यांत येऊन दक्षिणश्वराच्या देवालयांत राहिला, आणि हजारों सुशिक्षितांच्या—युनिव्हर्सिटीमध्यें नांव गाजवलेल्या माणसांच्या, युरोपियन शिक्षण पूर्ण मिळवलेल्या माणसांच्या—झुंडीच्या झुंडी या साधूच्या चरणीं वंदन करण्यास प्रत्यहीं येऊं लागल्या. एव्हांपासून भरतखंडाला मुक्ति मिळण्याचे कामास आरंभ झाला. यावरून चळवळीचे खरे पुढारी कोण आहेत तें लक्षांत आणा. मी हा मुद्दा तुम्हांला विशेष सांगतों कीं, बंगाल्यांत ज्याच्यावर सत्पुरुषाचा अनुग्रह झाला नाहीं असे फारच थोडे लोक आहेत. बिपिन बाबूंवर एका साधूनें अनुग्रह करून या चळवळीच्या कामीं स्फूर्ति दिली आहे. आज ज्या पत्रावर खटला चालला आहे त्याच्या संस्थापकावरही साधूचा अनुग्रह होता. हा संस्थापक एक प्रसिद्ध पुढारी होता, बंगालमध्यें सर्वतोमुखीं त्याचें नांव गाजत होतें, आणि नव्या चळवळीला त्याचें किती तरी उत्तेजन मिळालेलें आहे. हा मनुष्य साधूप्रमाणें राहिला. त्याला ईश्वरी प्रेरणा होती व तिचेंच त्याला पाठबळ होतें. परवां राष्ट्रीय शिक्षणावर मीं तुम्हांला व्याख्यान दिलें आणि तेव्हां राष्ट्रीय शिक्षणास वाहून घेतलेल्या एका माणसाबद्दल मीं तुम्हांला सांगितलें होतें. कलकत्त्याच्या राष्ट्रीय कालेजाची स्थापना त्यानेंच जुळवून आणली. तो एका संन्याशाचा शिष्य असून स्वतः संन्याशाप्रमाणेंच जगांत रहात आहे. ईश्वरी प्रेरणेनें नेमून दिलेलें काम करणाऱ्या बंगालमधल्या तरुण स्वयंसेवकांकडे पहा, म्हणजे तुम्हांला काय आढळून येईल? त्यांना एवढा जोर कसला आहे? त्यांच्या

मार्गांत येणारीं असंख्य विघ्नें सोसण्याचें व त्यांच्यावर होत असलेल्या जुलुमाचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं कोठून येतें ? याबद्दल मी आपल्याला थोडेंसें सांगतों. हिंदुस्थानांत कांहीं लोक आहेत ते राष्ट्रीयत्वाला वेडेपणा मानतात. हे लोक हुषार आहेत, पुष्कळ शिकलेले आहेत, त्यांनीं अर्थशास्त्राचा अभ्यास केला आहे, इतिहासाचा अभ्यास केला आहे,ते संभावित आहेत, ते पुढारी होण्याच्याही योग्यतेचे आहेत. असें असून ते ह्मणतात कीं, राष्ट्रीयत्व हिंदुस्थानचा नाश करील. ते असें ह्मणतात तरी काय ह्मणून ? त्यांच्यापैकीं बरेच जण देशभक्त आहेत, शुद्ध अंतःकरणाचे आहेत, प्रामाणिक आहेत, देशाचें कल्याण व्हावें अशी इच्छा करणारे आहेत. तर मग त्यांच्यांत नाहीं तरी काय ? नाहीं तें हें; कीं त्यांना आजपर्यंत शिक्षण मिळालें तें सर्व बुद्धिविषयक. बुद्धीला काय वाटणार? केवळ बुद्धीच्याच साहाय्यानें वागलांत तर ती काय सांगणार ? तुह्मीं ज्या कार्याला हात घातला आहे तें तर प्रचंड आहे, आणि तुमचीं साधनें तर कुचकामाचीं आहेत. तुह्मांला ज्यांच्याशीं टक्कर द्यायची आहे ते किती तरी बलाढ्य आहेत, त्यांची व्यवस्था, शिस्त, तयारी अगदीं जय्यत आहे, आधुनिक शास्त्रानें तयार केलेलीं सर्व शस्त्रें त्यांच्याजवळ आहेत; सत्ता आणि अधिकार यांचा त्यांना आधार आहे. एवढ्या प्रचंड शत्रूचा प्रतिकार करून यश मिळविण्यास तुमच्याजवळ अशीं कोणतीं साधनें आहेत ? बुद्धिविषयक दृष्टीनें—तर्कशास्त्राच्या दृष्टीनें याचा विचार करा ह्मणजे तुह्मांला निराशेवांचून दुसरें कांहीं दिसणार नाहीं. हे लोक अशाच दृष्टीनें विचार करतात व त्यांना सर्व शून्यवत् भासतें. पण उलट या देशभक्तांकडे पहा. त्यांच्यावर खटले चालले आहेत. त्यांचा प्रतिकार ते कसा करतील ? प्रतिकार त्यांना करितां यावयाचा नाहीं. त्यांना तडक तुरुंगाचा रस्ता धरला पाहिजे. "अशा प्रकारचा प्रतिकार तुह्मी किती दिवस करूं शकाल ? असा कांहीं लोक प्रश्न करतात. हा सह्य प्रतिकार किती दिवस टिकेल ? तुमचे सारे पुढारी, सारे सशक्त लोक तुरुंगांत टाकतील, तुह्मी चिरडले जाल, नव्हे तुमचें राष्ट्र चिरडलें जाईल." निव्वळ तर्कशास्त्रानें याचा विचार केला तर हें ह्मणणें बरोबर दिसतें. राष्ट्रीयत्वाच्या धर्माप्रमाणें वागण्याचा हा निश्चय केल्यावर जे तुह्मांला छळण्याच्या उद्योगास लागले आहेत, त्यांचा प्रतिकार करण्याचें कांहीं दृश्य शस्त्र आमच्याजवळ नाहीं. मी ह्मणतों,

दृश्य शस्त्राचा उपयोग होईल, पण जर सर्वस्वीं दृश्य शस्त्रावरच तुम्ही अवलंबून रहाल तर चुकीचें होईल. जर तसें रहायचें असेल तर मग खुशाल राष्ट्रीय चळवळीला ' वेडेपणा ' ह्मणा. सभ्य गृहस्थहो, हा मुद्दा चुकीचा नाहीं काय? राष्ट्रीयत्वापासून जर फायदा नाहीं, तर मग आहे तरी कशापासून? तर्कशास्त्रानें विचार केल्यास—नेमस्तांच्या दृष्टीनें विचार केल्यास—फायदा आहे कशापासून? नेमस्तांचा भरंवसा आहे कशावर? त्यांचा भरंवसा परकीयांवर आहे. जर तुमचा परमेश्वरावर विश्वास नाहीं, जर तुमचा भौतिक सामर्थ्यापेक्षां जास्त जोरदार अशा अदृश्य शक्तीवर भरंवसा नाहीं, तर मग परकी लोक जें देतील तेवढ्यावरच तुह्मांस अवलंबून रहावें लागेल. हिंदुस्थानचा उद्धार करण्यासाठीं परमेश्वर जें करणार नाहीं तें परकी सरकार करील असें ह्मणणारे कांहीं लोक आहेत. **परमेश्वराच्या हातून जें मिळण्याची तुह्मांला आशा नाहीं, तें ब्रिटिश सरकारकडून मिळेल अशी तुह्मी आशा करीत आहां. ही तुमची आशा व्यर्थ आहे. त्यांचे आणि तुमचे हितसंबंध अगदीं वेगळे आहेत; त्यांचा ज्यांत फायदा तीच गोष्ट ते करणार.** यापेक्षां निराळें कांहीं होणार नाहीं. तर मग हें तर्कशास्त्र—हा बुद्धिवाद—तुह्मांला कोणीकडे नेत आहे? जर निव्वळ बुद्धिवादाला शेवटपर्यंत अनुसरलां तर तुह्मांला निराशच व्हावें लागेल. या वादानें तुमचें राष्ट्र ठार होईल. तुह्मांला तर भौतिक सामर्थ्य पाहिजे आणि तें तर तुमच्यापाशीं नाहीं; कांहीं असेल त्याचा चुराडा शत्रु केव्हांच करून टाकतील. आणि तें सामर्थ्य मिळवूं ह्मणाल, तर तुमचे शत्रु कांहीं इतके बोळ्यानें दूध पिणारे खास नाहींत कीं तें तुह्मांला मिळवूं देतील. एकंदरींत निष्कर्ष काय निघतो कीं, आपण करण्यासारखें कांहीं नाहीं, हा देश ठार होणार; हाच निष्कर्ष कीं नाहीं? बुद्धिवादाचा निष्कर्ष शेवटीं हाच निघणार. या विषयावर मी पुण्यास बोललों आणि तेव्हां बंगालचा अनुभव सांगितला. स्वदेशी चळवळीस प्रारंभ होण्याच्या अगोदर तीन चार वर्षें मी बंगाल्यांत गेलों. आपला उद्धार होण्याची कांहीं आशा आहे कीं नाहीं, लोकांची स्थिति काय आहे, खरी चळवळ लोक करूं शकतील कीं नाहीं हें अजमावण्याचा माझा उद्देश होता. त्यावेळेस लोकांमध्यें निरुत्साह व निराशा मला आढळून आली. आपल्या हातून कांहीं होणार नाहीं, आपली उन्नति परक्यांकडून होईल, परकी राष्ट्र हात धरून आपणांस वर

काढील असें पूर्वी लोकांना वाटत असे. आतां असें काडीमात्र देखील कोणाला वाटत नाहीं. परक्यांची मदत व्हावयाची नाहीं हें त्यांना उमजलें आणि नंतर त्यांना कोणाचाही आधार राहिला नाहीं. त्यांच्या बुद्धीला दुसरा आधार सांपडेना आणि साहजिकपणें ते निरुत्साही आणि निराश झाले. जे लोक चळवळीच्या कामांत मनापासून पडले होते त्यांना देखील भरंवसा नव्हता आणि आपलें राष्ट्र बुडणार अशी त्यांची ठाम समजूत झाली होती. लोक असे निराश झाले ही गोष्ट बंगालच्या दृष्टीनें ठीकच झाली, कारण बुद्धिवादानें आपली शिकस्त केली, आंतां बुद्धीचा—तर्काचा—कांहीं उपाय नाहीं, तो निरुपयोगी आहे, असें तरी बंगाल्यांत एकदां निश्चित झालें.

बुध्दीच्या हातून निराशेशिवाय दुसरें फळ मिळेना. अर्थात् बुद्धि थकल्यावर अं-तःकरण पुढें सरसावलें व त्यानें ईश्वरी प्रेरणेचा स्वीकार केला. बंगालनें हा नि-रोप एका क्षणार्धांत स्वीकारला, सर्व राष्ट्र क्षणार्धांत खडबडून जागें झालें, भ्रमा-चा आणि निराशेचा निरास झाला; आणि या भ्रमनिरासानें—या जागृतावस्थेनें—बंगालच्या मोक्षाचा मार्ग सांपडला व आपलें राष्ट्र अमर आहे, तें दुःस्थितींत रहाणार नाहीं असें सर्व भरतखंडाच्या नजरेस आलें ( टाळ्या ). बंगालला अशी श्रद्धा उत्पन्न झाली. भौतिक तत्वांपेक्षां जास्त महत्वाचें तत्व बंगालला सांपडलें. कारण परमेश्वरावर श्रद्धा ठेऊन प्रत्यक्ष कृति करणें यापेक्षां महत्वाचें दुसरें कांहीं नाहीं. ईश्वरनिर्मित शक्तीच्या विरुद्ध ईश्वरानेंच उत्पन्न केलेल्या दुसऱ्या शक्तींचा झगडा चालू होतो, तसाच प्रकार नंतर बंगाल्यांत झाला. कारण झगडा केल्यावांचून दैवी शक्तिचें सामर्थ्य वाढत नाहीं. संकटें सोसल्याशिवाय, निर्हेतुक काम केल्याशिवाय, स्वार्थत्यागाचा जोर असल्याशिवाय आपल्या मनांतल्या ईश्वरी प्रेरणेचें सामर्थ्य वाढणार नाहीं. दुसऱ्यांकरितां काम केल्यामुळेंच—असुरांनीं त्रास दिल्यामुळेंच श्रीकृष्णाचें सामर्थ्य नजरेस आलें. ही प्रेरणा बंगालच्या मनांत उद्भवून भावी उन्नतीविषयीं आशा आल्यावर, राष्ट्रीयत्वावर सर्व तऱ्हेचे हल्ले झाल्यानंतर बंगाली राष्ट्रापुढें हा प्रश्न उपस्थित झाला कीं, ' तुह्मी संकटें सोसाल काय ? या हालअपेष्टांतून तुह्मी पार पडाल काय ?' या नवीन उत्पन्न झालेल्या श्रद्धेमुळें जे तरुण सर्व विघ्नांना नाहींसें करण्यास पुढें सरसावले, त्यांना हालअपेष्टा सोसणें भाग पडलें. त्यांच्या वांट्यास यश न येतां सत्य मतांसाठीं मृत्यू आला.

त्यांच्या अंतःकरणांत ज्या सामर्थ्यानें प्रवेश केला होता तें सामर्थ्य कसें आहे याची प्रतीति अद्याप यावयाची होती. तें सामर्थ्य त्यांचें स्वतःचें नव्हतें, ती एक अदृश्य शक्ति होती, त्या शक्तीनें आपण निमित्त मात्र आहों हें त्यांना शिकावयाचें होतें. तर मग आह्मी शिकलों तें काय ? आजची जी परिस्थिति मी तुह्मांला सांगत आहें, त्या परिस्थितीला कशाची जरूरी आहे ? याला कांहीं राजकीय तयारीची जरूरी नाहीं. मी आजपर्यंत पुष्कळ विषयांवर बोललों, पुष्कळ विषयांवर लेखही लिहिले; स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, गांवपंचायती इत्यादि विषयांसंबधानें लेख लिहिले. पण मीं किंवा माझ्या बरोबरच्या मंडळीनें जो ह्मणून उपदेश केला त्या उपदेशाचा पाया एक निराळेंच तत्व आहे. तें हें कीं, आमच्या देशाचा उद्धार निवळ राजकीय चळवळीनें होणार नाहीं, निवळ राष्ट्रीय शिक्षणानें व्हायचा नाहीं, स्वदेशीनें व्हायचा नाहीं, तर एक बहिष्कारानेंच होईल. नुसत्या स्वदेशीनें थोडीशी भौतिक भरभराट होईल, आणि संपत्तीच्या धुंदीमध्यें, तिच्या आकर्षणामध्यें सांपडून जाऊन ती सुरक्षित राखण्याच्या नादीं मुख्य गोष्ट विसराल. परकी अंमलाखालीं सांपडलेल्या दुसऱ्या देशांतही भौतिक सुधारणा झालेली होती. रोमन साम्राज्यामध्यें भौतिक सुधारणा होती, औद्योगिक प्रगति होती. परंतु भौतिक आणि औद्योगिक सुधारणेनें राष्ट्रांत जीव उत्पन्न झाला नाहीं. जेव्हां परीक्षेचा समय आला तेव्हां हीं औद्योगीक व भौतिक सुधारणेंत गुंतलेलीं राष्ट्रें जिवंत नव्हतीं असें प्रत्ययास आलें. तीं राष्ट्रें मेलेलीं होतीं आणि बाहेरून यत्किंचित् धक्का बसतांच त्यांच्या ठिकऱ्या उडाल्या. याकरितां एखादी विशिष्ट पद्धत आज जरूर आहे असें समजूं नका. हे नुसते काम करण्याचे निरनिराळे मार्ग आहेत, राष्ट्रामध्यें ईश्वरी प्रेरणा जें कार्य चालवीत आहे तिचीं हीं दृश्य स्वरूपें आहेत. पण त्याची कांहीं आज मुख्यतः जरूरी नाहीं. आज मुख्य जरूरी कोणत्या गोष्टीची आहे? जे थोर लोक आज तुरुंगांत गेले आहेत त्यांना कसली मदत आहे ? मायाजाल तोडण्याचें, संकटें सोसण्याचें, विघ्नांचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं कोठून आलें ? तें सामर्थ्य एका कल्पनेपासून आलें ती कल्पना ही कीं, **एक अद्भुत प्रतापी दिव्य शक्ति भरतखंडाची उन्नति करीत आहे, आह्मी केवळ त्या शक्तीच्या आज्ञेनें वागत आहोंत.** आपण काय करीत आहों हें पुष्कळदां त्यांना ठाऊक सुद्धां नसतें. आपल्याला कोण प्रेरणा करितो आहे, किं-

वा आपण कोणीकडे चाललों आहों याची त्यांना नेहमीं कल्पना असतेच असें नाहीं पण त्यांची खात्री—अंतःकरणाची, बुद्धिवादाची नव्हे—होती कीं, जी शक्ति आपणांस प्रेरणा करीत आहे ती अजिंक्य आहे, सर्वशक्तिमान् आहे अमर आहे, तिचा कोणी प्रतिकार करूं शकणार नाहीं आणि ती आपलें कार्य हटकून शेवटास नेईल. आपणांस कांहीं करावयाचें नाहीं; फक्त त्या शक्तीची आज्ञा पाळावयाची. ती जिकडे नेईल तिकडे जायचें. ती शक्ति जे शब्द उच्चारण्यास सांगेल ते उच्चारावयाचे. जें करण्यास सांगेल तें करावयाचें. तिनें तुरुंगाकडे बोट दाखविलें कीं तुरुंगांत जायचें. जें जें सहन करण्यास ती सांगेल तें तें आनंदानें सहन करायचें. संकटें सोसून आपणांस काय फायदा आहे इकडे ते लक्ष देत नाहींत, व्यवहारज्ञ लोक हें शहाणपणाचें नव्हे असें सांगतात; या योगानें देशाचें सामर्थ्य कमी होईल, उत्तम कार्यकर्ते नाहींसे होतील, आपलें सामर्थ्य एकवटणार नाहीं, असेंही सांगतात. परंतु बाहेरून दिसणाऱ्या सामर्थ्यापेक्षां राष्ट्रापाशीं कांहीं निराळें सामर्थ्य आहे अशी आमची समजूत आहे. ती एक शक्ति आहे; तिला माझी जरुरी नाहीं, तुझी नाहीं, त्याची नाहीं, बिपिनचंद्र पालची नाहीं, जितके कार्यकर्ते कारागृहांत गेले आहेत त्यांची नाहीं. यांपैकीं कोणीही नको. त्यांना एका बाजूला टाकून दिलें तरी त्यामुळें देशाचें नुकसान होणार नाहीं. सर्व कार्यकर्ता ईश्वर आहे. आह्मी कांहीं करीत नाहीं. जीं संकटें सोसण्याची तो आह्मांला आज्ञा करितो तीं आह्मी सोसतों, कारण आमच्या संकटांनीं इतरांना सामर्थ्य येतें. तो आह्मांला बाजूला टाकतो, कारण आमची जरुरी राहिलेली नसते. जर हा प्रकार असाच चालेल तर नुसत्या कारागृहानेंच भागणार नाहीं, आह्मांला प्राण अर्पण करावे लागतील; आणि जे आज अघाडीस आहेत अगर जे अवश्यक वाटतात त्यांना जरी प्राण अर्पण करण्याचा प्रसंग आला तरी ईश्वराला ती देईल गोष्ट पाहिजे आहे, ती करण्यास त्यानेंच आज्ञा केली आहे, आणि त्यांच्या ऐवजीं तो दुसरे वीर निर्माण करील असेंच आह्मी समजूं. आमचा पाठीराखा तोच आहे. कार्य तोच कार्यकर्ताही तोच. तो लोकांच्या अंतःकरणांत अक्षय राहिला आहे. एकंदरीत बंगालमध्यें काय आहे ती श्रद्धा आहे. ती आपणांमध्यें आहे हें देखील कांहीं जाणत नसतील, कांहीं तिला श्रद्धा हेंच विशिष्ट नांव देत नसतील.

आतां मीं सांगितलेंच कीं, आमच्यामध्यें बुद्धीचा विकास फार झाला आणि ति-चा अद्याप आमच्यावर पगडा आहे. परंतु अलीकडे पुष्कळांमध्यें ही श्रद्धा उत्पन्न झाली आहे; कारण मी देशाकरितां जिवंत रहातों, संकटें सोसतों अशी भावना पुष्कळांना वाटूं लागली आहे. केवळ माझ्यामध्यें ईश्वर नाहीं, तो माझ्या सर्व देशबांधवांमध्यें आहे, ईश्वरावर माझी भक्ति आहे, ईश्वराकरितां मी हाल सोस-तों. अशाप्रकारें ईश्वरानें नेमून दिलेलें काम पुष्कळ करूं लागले आहेत, व मनु-ष्याला कोणती दिशा दाखवावी हें त्यालाच उत्तम समजतें. तो उत्तम दिशाच दाखवील यांत शंका नाहीं.

'श्रद्धे' प्रमाणेंच दुसरी गोष्ट 'स्वार्थाचा अभाव' ही होय. ही बंगा-ल्यांतील चळवळ—ही राष्ट्रीयत्वाची चळवळ स्वार्थहेतुक मुळींच नाहीं. कांहीं जणांना काय वाटेल तें वाटो, पण आह्मी हें राजकीय स्वार्थासाठीं मुळींच करीत नाहीं. हा एक धर्म आहे व त्याप्रमाणें आह्मी आचरण करीत आहों. राष्ट्रामध्यें-देशबांधवांमध्यें—जें ईश्वरी स्वरूप आहे, तें या धर्माचरणानें ओळखतां येतें. आमच्या तीस कोटी लोकांमध्यें असलेलें त्याचें स्वरूप दृग्गोचर होण्यासाठीं आह्मी यत्न करीत आहोंत. स्वार्थाकरितां नव्हे, तर इतरांकरितां काय कर-ण्यासाठीं आणि मरण्यासाठीं आह्मी—कांहीं जण जाणूनबुजून कांहीं जण अजा-णतां—प्रयत्न करीत आहों. एखाद्या तरुण बंगाल्याला तुरुंगांत जावें लागलें, हाल सोसावे लागले, तर त्याला मुळींच दुःख वाटत नाहीं; तो हालअपेष्टांना भीत नाहीं. तो आनंदानें पुढें सरसावतो. तो आपल्या मनाशीं ह्मणतो, "माझें काम संपण्याची वेळ आली, ईश्वराच्या यज्ञभूमीवर मला जाण्याची वेळ आली, आणि देशबांधवांच्या कल्याणाकरितां हाल सोसण्याचें काम मजकडे आलें हे त्याचे माझ्यावर उपकार आहेत. आज मला अत्यानंद होत आहे; माझ्या जन्माचें आज सार्थक झालें." राष्ट्रीयत्वरूपी धर्माचें हें दुसरें स्वरूप आहे. मी ह्मणून कोणी विशिष्ट नाहीं, तीस कोटी लोक ह्मणजेच मी आणि ह्मणजेच परमेश्वर.

तिसरी गोष्ट 'धैर्य' ही होय. 'श्रद्धा' किंवा 'स्वार्थाभाव' यांचेंच हें तिसरें नांव आहे ह्मटलें तरी चालेल. ईश्वरावर तुमचा विश्वास असला, ईश्वर आपला मार्गदर्शक आहे अशी श्रद्धा असली, ह्मणजे मग ईश्वरच सर्व करील

आहे, तुह्मी कांहीं करीत नाहीं, मग भय तरी कसलें? दुसऱ्यांच्या हिताकरितां स्वतःची पर्वा करावयाची नाहीं, आपलें द्रव्य, शरीर, सर्वस्व द्यावयाचें, किंबहुना प्राणही अर्पण करावयाचा हा एकदां तुमचा धर्म झाला ह्मणजे मग तुह्मांला भय कसलें उरलें? कशाचेंही भय नाहीं. या जगांतल्या न्यायासनापुढें तुमची चवकशी चालली असतांना तुमचें धैर्य तिळमात्रही खचणार नाहीं. कारण तुमचा 'धर्म'च सांगतो आहे कीं तुह्मी धैर्यवान् आहां. एकदां हा राष्ट्रीयत्वरूपी धर्म स्वीकारला ह्मणजे मग तुमचेपण निघून जाऊन तुह्मी ईश्वरस्वरूपीच बनतां, आणि ह्या चवकशा किंबहुना हें सर्व जग हृदयस्थ ईश्वराला काय करूं शकेल? जो अमर आहे, ज्याला जननमरण नाहीं, ज्याला तरवार इजा करूं शकत नाहीं, अग्नि जाळूं शकत नाहीं, उदक बुडवूं शकत नाहीं, त्याला या जगांतले नश्वर शत्रू काय करूं शकतील? त्याला तुरुंग तुरुंगांत अडकवूं शकत नाहीं, फांस फांसावर चढवूं शकत नाहीं. आपल्या अंतःकरणांमध्यें ईश्वर वास करीत आहे अशी निष्ठा असल्यावर तुह्मांला भीति कसली? अर्थातच धैर्य असणें जरूर आहे, धैर्य असणें स्वाभाविक आहे, धैर्य असणें अपरिहार्य आहे. जर युरोपियन दृष्टीनें-ह्मणजे फक्त भौतिक दृष्टीनें—राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी असाल, ह्मणजे परक्यांचें राज्य काढून दुसऱ्या कोणाचें आणावयाचें असेल–तर तुह्मी फक्त भौतिक दृष्टीनें बदललां आहां; ही दृष्टी कांहीं धर्म नव्हे; याचा असा अर्थ होत नाहीं कीं, तीस कोटी लोकांसाठीं तुह्मीं हळहळत आहां, त्यांचा तुह्मांला उद्धार करावयाचा आहे, त्यांचें तुह्मांला कल्याण करावयाचें आहे. याचा अर्थ एवढाच होईल कीं, हे राज्यकर्ते परकी आहेत, ह्यांच्या जागीं आपण असावें एवढीच तुमची इच्छा आहे; तुह्मांला देशाचें स्वातंत्र्य नको, तर परक्यांचें राज्य जाऊन तुमचें राज्य व्हावें. जर अशा बुद्धीनें तुह्मी काम करीत असाल तर कोटींमध्यें तुह्मी कसे टिकाल? त्यावेळीं तुमच्या अंगीं धैर्य कोठून येईल? त्या खटल्यास तोंड देण्याची तुमची छाति होईल काय? तुह्मी केवळ बुद्धिवादानें राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी होतां असें तुमच्या लक्षांत येईल. परीक्षेची वेळ आली ह्मणजे तुमचें मन तुह्मांला काय ह्मणेल? तुमची बुद्धि तुह्मांला काय सांगेल? ती सांगेल, "देशाकरितां ह्मटणें हें सर्व ठीक आहे; पण इकडे मी मरतों आहें, मला त्रास होत आहे, याचा कांहीं फायदा असला तरी तो मला कसा मिळणार? मी तर मरून जाईन! दुसऱ्यांना हो-

णाऱ्या सुखाकरितां मी काय ह्मणून हाल सोसावे ? हें माझें घर आहे, ही माझी इष्टेट आहे, या सगळ्यावर धाड येईल; तेव्हां आपण या भानगडींत पडूं नये. जर तुमच्यामध्यें ईश्वरावरील श्रद्धा आणि स्वार्थाचा अभाव नसेल, तर या इतर मायाजालाचा त्याग करावासें तुह्मांला वाटणार नाहीं. स्वतःला ज्यापासून फायदा नाहीं त्याकरितां संकटें सोसावीं असें वाटणार नाहीं. असें असल्यावर 'धैर्य' कोठून येणार ? परंतु जर तुमच्यामध्यें दिव्य कल्पना असेल, आपणांजवळ कांहीं नाहीं, आपण कोणी नाहीं, तीस कोटी लोक हेच ईश्वर आहेत, त्याचें परिमाण करतां येणार नाहीं, तर तुह्मांला कळेल कीं, आपण कांहीं तरी शाश्वत वस्तू-करितां सर्व करीत आहों; शाश्वत शक्ति आपल्या हातून सर्व कांहीं घडवून आणीत आहे. ह्मणजे मग कोणचीही माया तुह्मांला हरकत करूं शकणार नाहीं. तुमच्या मनांत दुसरा कोणताही विचार येणार नाहीं, धैर्य आपोआपच उत्पन्न होईल, तें आणण्याचें कारण पडणार नाहीं. त्या दिव्य शक्तीच्या आज्ञेनेंच तुह्मी काम कराल. ती शाश्वत शक्ति तुमचें सर्वकाळ रक्षण करील. प्रत्यक्ष मरणसमयीं आपण अमर आहोंत अशी तुह्मांस खात्री वाटेल. दुःखें सहन करीत असतांना आपल्या-ला त्रास देण्याचें कोणाचें सामर्थ्य नाहीं असें तुह्मांला वाटेल.

ह्या तीन गोष्टी सांप्रतच्या परिस्थितीला अवश्यक आहेत हें मीं सांगितलें. कारण परिस्थिति आहे ती अशी आहे.–तुह्मीं एक कार्य आपल्या शिरावर घेतलें आहे. जें कार्य वर वर पहाणाराला अशक्य दिसतें तें कार्य करण्याचें तुह्मीं अंगावर घेतलें आहे. या प्रयत्नामुळें जगांतले अतिशय सामर्थ्यवान् शत्रू तुह्मां-ला निर्माण होतील. प्राचीन काळीं जेव्हां ईश्वर अवतार धारण करी तेव्हां अति-शय बलाढ्य असुरांचाही जन्म झालेला असे. तुह्मी हें पक्कें लक्षांत ठेवा कीं, तुह्मी हा राष्ट्रीयत्व धर्म अंगीकारलात कीं, या जगांत कोणालाही अपरिहार्य असे भौतिक शत्रू तुह्मांला उत्पन्न होतील. परीक्षेची वेळ लांब नाहीं, ती आलीच आहे. या वेळीं बुद्धिमत्तेचा काय उपयोग होणार ? वरवर उत्साह असला तर तो कितीसा उपयोगी पडेल ? नुसतें 'वंदे मातरं' ओरडण्यानें काय होणार ? परीक्षेच्या वेळीं या बाह्य देखाव्याचा काय फायदा ? बंगालमध्यें जे लोक संकटें सोशीत आहेत त्यांच्या जागीं आपण आहोंत असें समजा, ते धैर्यवान् आहेत कीं नाहींत तें लक्षांत आणा, आणि त्यांच्याप्रमाणें आपल्यावर प्रसंग आल्यास त्याला

तोंड देण्याचें आपल्या अंगीं सामर्थ्य आहे कीं नाहीं तें पहा. कशाच्या जोरावर आपण त्याला तोंड देऊं, आपण त्यांत यशस्वी कसे होऊं, याचा पुरता विचार करा. मीं आतां दाखविलें कीं, भौतिक सामर्थ्यानें त्या प्रसंगाला तोंड देतां येणार नाहीं. याशिवाय दुसऱ्या प्रकारचें सामर्थ्य तुमच्यामध्यें आहे काय ? राष्ट्रीयत्व ह्मणजे काय याची तुह्मांस कल्पना आली काय ? ' तो एक धर्म आहे व त्याचा आपण अंगीकार करीत आहों ' अशी तुमची खात्री आहे काय ? जर असेल तरच आपणांस राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी ह्मणवा, आणि त्याप्रमाणें यावज्जीव आचरण करण्यास तयार व्हा. आपलें अंत:सामर्थ्य ओळखा, व जें कार्य कराल तें तुह्मीं न करितां तुमचा अंतरात्मा करील अशा तऱ्हेनें तें सामर्थ्य जगास दाखवा. तुमच्या अंत:करणांत जी शाश्वत दिव्य शक्ति आहे ती घटकोघटकीं दृष्टोत्पत्तीस येईल, तुमचा प्रत्येक विचार तिच्या प्रेरणेनें होईल, तुमच्या अंगीं जो जो गुण असेल त्याचा उपयोग तिच्याकडेच होईल अशा प्रकारचें वर्तन ठेवण्याविषयीं झटा ह्मणजे मग तुह्मी अशी तक्रार करणार नाहीं कीं, लोक आळशी आहेत, ते ही कल्पना लवकर ग्रहण करीत नाहींत, आमचे पुढारी चांगले नाहींत, आमच्यांतले मोठे लोक निराळाच मार्ग दाखवितात. अशा प्रकारच्या तक्रारी तुह्मी मुळींच करणार नाहीं, कारण मग तुह्मांला कोणा पुढाऱ्याचीच जरूर रहाणार नाहीं. **तुमच्या हृदयांत तुमचा पुढारी आहे.** त्याला ओळखून तो सांगेल तसें वागल्यास लोक तुमचें ऐकल्यावांचून रहाणार नाहींत. ती प्रेरणा व तें सामर्थ्य तुमच्या हृदयांतच आहे. जर ही स्वत:ची शक्ति तुह्मी ओळखाल, जर तिच्या सन्निध तुह्मी रहात असाल, जर तिच्याशीं तुह्मी एकरूप झाले असाल तर खात्रीनें तुह्मांला आढळून येईल कीं, लोक तुमचें ह्मणणें मान्य करतील, तुमच्या सांगण्याप्रमाणें वागतील, तुह्मी जो मंत्र सांगाल तो सर्व जण स्वीकारतील, आणि शेंपन्नास वर्षें नाहींत तर फारच थोड्या अवधीमध्यें बंगालप्रमाणें अवघ्या तीन वर्षांत सर्व गा[illegible] बदलेल, त्यामध्यें नवीन जोम उत्पन्न होईल, सर्वत्र आपल्या राष्ट्राचें गाजूं लागेल. राष्ट्रीयत्वाचा मंत्र बंगालकडून आला, ह्याचें उदाहरणही बंग घालून दिलें. ज्या बंगालला कोणी मान देत नसे, आणि ज्यामधील हिंदुस्थानांत सर्वांत नेभळे मानण्यांत येत असत, तोच बंगाल तीन वर्ष[illegible]

आंत विलक्षण बदलला आहे. याला कारण फक्त एवढेंच कीं, आपल्या हृदयामधील ईश्वरी स्वरूप ओळखण्यास ज्यांना सांगितलें त्यांनीं तें ओळखलें, त्या ईश्वरी शक्तीकरितां हाल सोसले, तिच्या आज्ञेप्रमाणें आचरण केलें आणि आपल्या आचरणानें इतरांसही उदाहरण घालून दिलें. अशा रीतीनें तीन वर्षांत बंगालमध्यें विलक्षण अंतर पडलें आहे व जो तो आश्चर्यानें थक्क होऊन विचारीत आहे कीं, " बंगाल्यांत हें चाललें आहे तरी काय ? " कोणत्याही विघ्नानें ही चळवळ थांबत नाहीं, कोणत्याही सामर्थ्यानें ही प्रगति नाहींशी होत नाहीं, राष्ट्रामध्यें नवीन अवतार जन्मास आला आहे, आणि जर तुह्मीं आपल्या अंतःकरणांत वसत असलेल्या ईश्वराचें स्वरूप जाणलें असेल, तर यापेक्षांही थोड्या काळांत ईश्वर सर्व भरतखंड बदलून टाकील. कारण ही दिव्य शक्ति आधींच प्रगट झाली आहे व ती आपलें कार्य आतां जास्त जास्त जोरानें करूं लागेल. सर्व जगाच्या ती दृष्टोत्पत्तीस येईपर्यंत, सर्व जगाला ती समजे पर्यंत तिचें कार्य अखंड चालेल. गोकुळांत—गरीब लोकांत— ज्यांना कोणी मान देत नाहीं अशा लोकांमध्यें असलेला—वृंदावनच्या गोपाळांमध्यें असलेला— श्रीकृष्ण आपलें माहात्म्य प्रगट करील, हें राष्ट्र उदयास येईल, या देशांतील लोकांचा उद्धार होईल, त्यांच्यामध्यें ईश्वरी प्रेरणा होईल, जगामध्यें कोणीही त्यांना प्रतिबंध करूं शकणार नाहीं, त्यांच्या मार्गामध्यें कोणालाही अडथळा आणतां येणार नाहीं. आपणांस ईश्वर सहाय आहे, हें ईश्वराचें काम आहे, तो आपल्याकरितां हें कार्य करीत आहे. उच्चपदास चढलेल्या आपल्या प्राचीन राष्ट्राकरितां त्यानें एक महत्वाचें कार्य राखून ठेवलें आहे. तो तें करण्यासाठीं पुन्हां तुमच्यामध्यें निर्माण झाला आहे. तें हें कीं, इतर राष्ट्रांप्रमाणें तुह्मी उन्मत्त न होतां, गरीबांना पायाखालीं न तुडवितां, सर्व जगाचा उद्धार [illegible]ण्यासाठीं तुह्मीं ' कांहीं तरी ' करावें. तें ' कांहीं तरी ' तुमच्या प्राचीन ऋ[illegible] ओळखून प्रगट केलें आहे, तेंच तुह्मी पुन्हा ओळखा आणि प्रगट करा, [illegible]गास प्रगट करा; आणि परमेश्वरानें स्वतः प्रगट व्हावें एवढ्याकरितां तुम[illegible]तःकरणांत असलेलें त्याचें स्वरूप ओळखा, तुह्मी आपलें जीवित पवित्र [illegible]पल्या राष्ट्राचें करा; ह्मणजे तुमच्या राष्ट्राच्या द्वारें ईश्वर जगापुढें प्रगट [illegible]णि तुमचें कार्य संपेल. हेंच कार्य तुह्मांस करावयाचें आहे. यावरून

तुमच्या लक्षांत येईल कीं, सध्यांची चळवळ केवळ राजकीय नव्हे, हें ईश्वरानें नेमून दिलेलें कार्य आहे.

---

## व्याख्यान चवथें.

## ' स्वराज्य '

( नाशिक येथें झालेलें व्याख्यान. )

" मी आजपर्यंत लेखक या नात्यानें माहीत होतों. वक्ता या नात्यानें माझी कोणास ओळख नव्हती. परंतु परिस्थितीच्या योगानें मला तसें होणें भाग पडलें आहे. आजचे व्याख्यानाचा विषय मीं अद्याप ठरविलाच नव्हता. परंतु कांहीं मित्रमंडळीचा आग्रह मीं ' स्वराज्य ' या विषयावर बोलावें असा पडला असल्यामुळें मीं त्याच विषयावर बोलण्याचें योजिलें आहे. अलीकडे दोन तीन वर्षांमध्यें आपल्या सुदैवानें या आपले देशांत नवीन चळवळ उर्फ नवीन शक्ति उत्पन्न झालेली आहे. या चळवळीचें अंतिम ध्येय काय आहे हें बरेच दिवस मुग्धावस्थेंत होतें. पण गतवर्षी कलकत्त्याचे कॉंग्रेसचे अध्यक्ष वृद्ध देशभक्त दादाभाई नौरोजी यांनीं आपले भाषणांत तें ध्येय ' स्वराज्य ' ह्मणून सांगितलें; ' स्वराज्य ' ह्मणजे कोणत्याही देशांतील लोकांनीं आपल्या देशांतील लोकांच्या कल्याणाकरितां आपल्या स्वताच्या पद्धतीवर चालविलेलें राज्य, तें स्वराज्य होय. हें आपलें खरें अंतिम साध्य आहे. ही खरी गोष्ट आपण आजपर्यंत विसरून गेल्यामुळेंच आपण अशा अधोगतींत येऊन पडलों. आतां आपलें अंतिम ध्येय आपणांपुढें असूनही जर आपण त्याची ओळख करून घेणार नाहीं तर आपण तीस कोट लोक अगदीं नामशेष होऊन जाऊं. तुह्मां महाराष्ट्रीयांना ' स्वराज्या ' ची थोडी तरी आठवण असेल, कारण शंभर वर्षांपूर्वीं ' स्वराज्य ' ही तुमच्या अनुभवांतली गोष्ट होती. स्वराज्य हा जीव आहे, स्वराज्य हें अमृत आहे, स्वराज्य ही मुक्ति आहे. शरीरास जसा प्राणवायु तसेंच स्वराज्य हें राष्ट्राचें जीवन आहे. जसा प्राणवायु नाहीं तर प्राणी जिवंत नाहीं, तसेंच ' स्वराज्य ' नाहीं तर राष्ट्रही जिवंत नाहीं. स्वराज्य नसलेल्या राष्ट्राची स्थिति कशी होते हें इतिहासावरून समजण्यासारखें आहे. पूर्वीं रोमन साम्राज्याचा

आमच्याप्रमाणें त्यांनाही सुरक्षित होता. पण दुःखाची गोष्ट अशी कीं, त्या इतर देशांचा प्राणवायु जें 'स्वराज्य' तें त्या देशांत नसल्याकारणानें ते देश सुखें भोगीत असूनही मेल्याप्रमाणेंच होते. कारण पुढें कांहीं कारणानें रोमन राष्ट्र बुडालें व त्याबरोबर सर्व साम्राज्याचें रक्षण करणारीं सैन्येंही पण नष्ट झालीं. अर्थात् त्याचे ताब्यांत असलेल्या इतर देशांतील लोकांस स्वराज्य नसल्यानें कोणी वाली राहिला नाहीं. मग वाटेल त्या रानटी लोकांनीं त्यांस हवें तसें छळलें. पुढें अनेक शतकांनीं जेव्हां ते लोक आपले पायावर उभे राहून त्यांनीं 'स्वराज्यें' स्थापिलीं तेव्हां ते लोक सुखी झाले. स्वराज्य ही अतिशय आवश्यक वस्तु आहे. ती दुसऱ्यांनीं देण्यापेक्षां आपली आपणच मिळवावी लागते. स्वराज्य मिळविण्याचे दोन मार्ग आहेत. एक ज्यांच्यापाशीं आपलें राज्य आहे त्यांजपासून भीक मागून तें मिळविणें किंवा दुसरा मार्ग ह्मणजे कोणा जवळच्या परराष्ट्राची मदत घेऊन तें मिळविणें. यांपैकीं पहिल्या प्रकारानें तें मिळणें मुळींच शक्य नाहीं. तो निव्वळ मूर्खपणाच आहे. भीक मागून स्वराज्य मिळविण्याची आशा धरून बसलेला एक वर्ग अजूनही आपल्यांत आहे, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. हिंदुस्थानामुळेंच ज्यांची योग्यता वाढली आहे, ज्यांचा देश संपन्न झाला आहे व होत आहे तो हिंदुस्थान देश इंग्लिशांचे हातांतून गेला ह्मणजे ते नामशेषच झाले ह्मणून समजावें. असें असतां इंग्लिश लोक आमचे हातीं स्वराज्य देतील ही कल्पना करणेंच मुळीं मूर्खपणाचें आहे. आजपर्यंत अशा कल्पनेवर विश्वास ठेवून आह्मी अधोगतीस तर गेलों आहोंतच पण नामशेषही होऊं. आतां दुसऱ्या तऱ्हेनें स्वराज्य मिळवूं ह्मणणें ह्मणजे आगींतून निघून फोपाट्यांत पडण्यासारखें आहे. कारण ज्यांची मदत घेणार तेही पण मनुष्यप्राणीच असल्याकारणानें त्यांचाही लोभ आडवा येणारच. तेव्हां एकंदरींत आमचें आह्मींच स्वराज्य मिळविलें पाहिजे.

हें स्वराज्य मिळवावें कसें? स्वराज्य मिळविण्याचीं साधनें आपणापाशीं नाहींत, व तें मिळालें अशी कल्पना केली तर तें राखण्याची तरी आपणांत शक्ति

स्वतंत्र झाल्याखेरीज स्वतंत्रता मिळत नाहीं. परमेश्वरानें प्रत्येक प्राण्याला नैसर्गिकच स्वतंत्र केलें आहे. अर्थात् या परमेश्वरी हक्कानें प्रत्येक जण स्वतंत्रच आहे अशी मनाची भावना झाली पाहिजे, व परमेश्वराविषयीं पूर्ण विश्वास असला पाहिजे. नंतर ही स्वतंत्रपणाची भावना राष्ट्रीय शिक्षणद्वारें सर्व राष्ट्रभर पसरविली पाहिजे. न्याय व अंमलबजावणीचीं कामें लोकांनीं आपले हातीं घेतलीं पाहिजेत. ह्मणजे पंचांमार्फत आपल्या तकारींचे निकाल लावून घेतले पाहिजेत. स्वदेशी आणि बहिष्कार या दोन उपायांनीं आह्मीं आमचा व्यापार वाढविला पाहिजे. हे दोन उपाय गेल्या दोन वर्षांत येथें बऱ्याच जारीनें सुरू झाल्यामुळें किती तरी फरक पडला आहे. याच दोन उपायांचे जोरावर आह्मी आपली सांपत्तिक उन्नति करून घेऊं अशी आमची खात्री आहे. या तिन्ही गोष्टी आह्मीं बंगाल्यांत सुरू केल्या आहेत, व आह्मांस चांगलें यशही येत चाललें आहे. इतकें केलें ह्मणजे आह्मीं निम्मे स्वराज्य मिळविलें. आतां इतकें करीपर्यंत प्रतिपक्ष निजला राहील असें मुळींच नाहीं. परंतु आमची अशी भावना आहे कीं, स्वराज्याकरितां धडपड करणें ही ईश्वराची आज्ञा आहे. व ती आह्मीं पाळलीच पाहिजे. ही भावना आमच्या बंगाली लोकांमध्यें इतकी जाज्वल्य आहे कीं, आमच्या मूठभर शत्रूंनीं उत्पन्न केलेल्या दंड, तुरुंग, फांशी, हद्दपारी इत्यादि संकटांचें आह्मांस कांहींच वाटत नाहीं. एखादा बंगाली मुलाला जर अशा कामीं शिक्षा झाली तर तो हंसत हंसत ह्मणतो कीं, कांहीं हरकत नाहीं, आह्मी आमच्या अंतिम साध्याची वाट एक पाऊलभर पुढें चालून गेलों. तर हे महाराष्ट्रवासीयांनो, ज्याअर्थी तुमचें व आमचें ध्येय एकच आहे, व आह्मीही आर्यभूमीचीं लेंकरें आहोंत, त्याअर्थी तुह्मी, आह्मी व इतर प्रांतांतील लोक मिळून ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें घडवून आणण्याच्या तयारीला लागूं या. आमची सर्व भिस्त तुमच्यावर आहे. कारण थोड्या कालापूर्वी तुह्मी शूर शिपाई होतां व स्वराज्याचाही उपभोग घेत होतां. तुमच्या महाराष्ट्रांत जेव्हां मुसलमा-



रानें भगवद्गीतेंत दिलेल्या वचनाप्रमाणें शिवाजी महाराजांचे रूपानें अवतार घेऊन दुष्टांपासून देशाचें संरक्षण केलें व देश स्वतंत्र झाला. हल्लींही तशीच स्थिति आहे. ही ईश्वरी प्रेरणा आहे. ही चळवळ कांहीं मनुष्यांनीं उत्पन्न केलेली नाहीं. ही परमेश्वराची आज्ञा आहे. ही आज्ञा पाळण्यास आपण एक झालें पाहिजे. आपण दृढ भावना धरून सत्याकरितां व आपल्या नैसर्गिक हक्कांकरितां ३० कोटी लोक एकत्र झालों ह्मणजे, या आपल्या प्रचंड झंझावातापुढें, वाऱ्यानें राखेचा पर्वत जसा कोणीकडच्या कोणीकडे नाहींसा होतो, तशी आपल्यास अडवूं पाहणाऱ्यांची स्थिति होईल. आपल्या प्रत्येकाचे शरीरांत ईश्वरी अंश आहे. या प्रत्येकाच्या शरीरांतील ईश्वरी अंशाचें तेज कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत एकवटलें असतां वेदांत वर्णन केलेल्या विराट पुरुषाचेंच तेज:पुंज स्वरूप एकदम उभें राहील. परमेश्वराची आज्ञा पाळण्याची दृढ भावना मनांत धरून त्याचें हें विराट स्वरूप आपण धारण केल्यावर आंग्लोइंडिअन ह्मणतात त्याप्रमाणें कित्येक शतकें तर राह्मोतच, पण आपले मवाळ बंधु ह्मणतात तीं शंभर वर्षें सुद्धां न लागतां माझी अशी खात्री आहे कीं, [illegible]ध्या १०–२० वर्षांत आपण आपलें जें अंतिम साध्य 'स्वराज्य' तें खात्रीं[illegible] मळवूं. आह्मीं बंगाली लोकांनीं तर हा उपक्रम सुरू केलाच आहे. ज्या इं[illegible]शांनीं आह्मांस नेमळट अशी पदवी दिली आहे, त्यांना आतां आह्मी नेभळ[illegible]नसून कसे शूर आहोंत हें लवकरच दिसून येईल."

---

## व्याख्यान पांचवें.

# राष्ट्रीय पक्षाचें धोरण.

### ( नागपूर. )

माझे प्रिय देशबांधवहो, मी सुरतकांग्रेसला जात असतां वाटेंत येथें उतरलों होतों तेव्हां आपल्या पुढें चार शब्द बोललों होतों. त्यावेळीं कांग्रेस व्हावयाची होती.

राष्ट्रीय पक्ष सुरतेस जमला,तो कांग्रेस मोडण्यासाठीं जमला होता, त्यांना कांग्रेस नको होती,कांग्रेस मोडण्याचा त्यांचा बेत पूर्वीपासून ठरला होता, अशीं बेधडक विधानें कित्येक पक्षाभिमानी पत्रें करूं लागलीं आहेत. परंतु मी आपणास असें विचारतों कीं, आमच्या नॅशनालिस्ट पक्षाला कांग्रेस मोडून काय बरें फायदा होता? राष्ट्रीय पक्षाला कांग्रेस पाहिजे होती; ह्या कांग्रेसच्या द्वारेंच आमच्या राष्ट्रीय मतांचा प्रसार आह्मांस करावयाचा होता. असें असतां कांग्रेस मोडून आह्मांस काय मिळणार होतें ? कांग्रेसच्या संबंधानें कित्येक जुन्या पक्षाच्या पुढाऱ्यांचीं अनेक पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत एकानें असें विधान केलें आहे कीं, बंगाल नॅश-नालिस्ट पक्षाला कलकत्त्यांतील'हेडक्वार्टर्स'मधून कांग्रेसच्या पहिल्या दिवशीं अशी तार आली होती कीं, Break up the congress if everything fails जर इतर बाबतींत जुळलें नाहीं, तर कांग्रेस मोडा, कांग्रेसचे तुकडे करा ! अशा प्रकारची तार आल्याचें विधान ऐकून आह्मांस मोठें आश्चर्य वाटलें ! नॅशनॅलिझमचें हेड क्वार्टर्स ह्मणजे काय ? राष्ट्रीय धर्माचें क्वार्टर्स एखाद्या शहरांत नाहीं, तें कल-कत्यास नाहीं, तें पुण्यास नाहीं, तें सर्व राष्ट्रभर पसरलेलें आहे ! सबंद राष्ट्र हेंच राष्ट्रीय धर्माचें आदिस्थान आहे. असें असतां कलकत्यांतील हेडक्वार्टर्स ह्मणजे कोणतें ? वरील तार कोणाकडून गेली, असें या मवाळ मंडळीस ह्मणावयाचें आहे? बंगाल्यांतील राष्ट्रीय पक्षाचे अग्रणी–आमचे पुढारी हें राष्ट्रीय धर्माचें 'हेड क्वार्टर्स' असें धरून चालल्यास कलकत्यास असें कोणतें 'हेड क्वार्टर्स' राहिलें होतें ? पुढारी हेडक्वार्टर्स समजल्यास आमचें एक हेडक्वार्टर्स सध्यां बक्सारच्या तुरुंगांत आहे, ( बाबू बिपिनपाल ) आणि दुसरें हेड क्वार्टर्स सुरतेस होतें ( अश्विनी-कुमारदत्त ? ) ! अशा प्रकारची तार राष्ट्रपक्षास आलेली नाहीं. गृहस्थहो, वरील विधान सपशेल खोटें आहे ! राष्ट्रीय पक्षास राष्ट्रीय सभा मोडावयाची नव्हती व ती त्यानें मोडलीही नाहीं. मी कोणास दोष देत नाहीं. पण मी असें विचारतों, कांग्रेस मोडून आम्हांस काय मिळणार होतें; कांग्रेस मोडून दुसऱ्या पक्षाशीं आपला संबंध तोडल्यास सरकार आह्मांवर थोडेंच खुष होणार होतें ?

सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतून ज्या लोकनियुक्त व लोकनियंत्रित संस्था आहेत, त्यांत प्रत्येक सभासदास कोणत्याही प्रश्नावर आपलें मत पुढें मांडण्याचा पूर्ण अधिकार सार्वजनिक संस्थांच्या सर्वमान्य नियमांनुसार मिळालेला आहे. हा अधिकार—हा प्रत्येक सभासदाचा निसर्गसिद्ध हक्क—दाबून टाकण्याची सत्ता कोणाही अध्यक्षास नाहीं. अध्यक्ष हा जमलेल्या सर्व लोकांनीं नेमलेला सभेचा नोकर आहे. त्यानें कसें वर्तन ठेवावें, ह्या संबंधाचे नियम आहेत. ह्या नियमांचें अतिक्रमण कोणाही अध्यक्षानें करतां कामा नये. त्याला मतस्वातंत्र्याची किंवा भाषणस्वातंत्र्याची दडपादडपी करतां येत नाहीं. असा हा जगन्मान्य सिद्धांत असतां सभेंतील एका सभासदाचा हक्क हिरावून घेण्याचा प्रयत्न कोणीं केला ? आह्मां राष्ट्रीय पक्षानें केला कीं आमच्या प्रतिपक्षानें केला ? योग्य वेळीं नोटीस पाठविली असतां आमच्या पक्षाच्या पुढाऱ्यास न बोलूं देण्यामुळें सभेच्या सर्व-मान्य नियमांचें उल्लंघन कोणीं केलें ? आह्मी राष्ट्रीयसभा मोडण्यासाठीं सुरतेस गेलों, असें ह्मणणारांनीं वरील प्रश्नाचा विचार केला पाहिजे. दुसरी महत्वाची गोष्ट अशी आहे कीं, कांग्रेस ही सर्व हिंदुस्थानच्या लोकांची—सर्व राष्ट्र-हितेच्छु लोकांची संस्था आहे. जे जे ह्मणून राष्ट्रहिताकरितां खटपट करितात, त्या सर्वांस त्या संस्थेंत स्थळ मिळालें पाहिजे. ज्याला ज्याला राष्ट्राचा गाडा पुढें ढकलावयाचा आहे, ज्याला ज्याला आपल्या देशाला सौख्य व शक्य असेल तितकें स्वातंत्र्य मिळविण्याची इच्छा आहे, त्या त्या मनुष्याचा राष्ट्रीय संस्थेंत समावेश झाला पाहिजे. एकाचें साध्य कमी उच्च, कमी उदात्त असेल, दुसऱ्याचें उदात्ततर असेल, तिसऱ्याचें उदात्ततम असेल, पण राष्ट्रहित हा सर्वांचा हेतु असल्यामुळें राष्ट्रीय संस्थेंत सर्वांचा समावेश झाला पाहिजे. एका पक्षानें दुसऱ्या पक्षाला बहुमताच्या जोरावर खुशाल पराभूत करावें व आपलें वर्चस्व स्थापावें. दुसऱ्या पक्षाच्या अंगांत धमक असेल, तर तो जिवंत राहील व झगडेल. परंतु यादृच्छिक स्थानिक बहुमताचा फायदा घेऊन दुसऱ्या पक्षास संस्थेंतून हांकून

वर कां लादलें जावें ? आमच्या राजकीय चळवळीचा अंतिम हेतु सर्वांचा सार-
खाच असेल असें नाहीं. एक पुढें असेल, दुसरा मागें असेल. यंदांच्या कान्स्टिटयू-
शनच्या ठरावामध्यें राष्ट्रीय पक्षाला संमत नाहीं अशा प्रकारचें ' अंतिम साध्य '
त्यांच्यावर लादलें जाणार होतें कीं नाहीं ? अशा प्रकारच्या आपणाला असंमत
असलेल्या खोट्या राष्ट्रीय धर्मांच्या तत्वाच्या कागदावर राष्ट्रीय पक्षाच्या सभासदांना
सह्या करावयास लावणें ह्मणजे त्यांच्या मतांची थट्टा करणें होय. आपली 'अंतिम
साध्या ' संबंधाची कल्पना लोकांवर लादण्याचा व ते लादून घेतील तर त्यांची
राष्ट्रीय सभेंतून हाकालपट्टी करण्याचा कोणास हक्क आहे? ' अध्यांमुध्यां स्वराज्याचें
व मंदमंद सुधारणांचें' अंतिम राष्ट्रांतील एका विविक्षित पक्षास मान्य नाहीं ही गोष्ट
ना० गोखल्यांस माहित होती. तरी कास्टिटयूशनचा जो मसुदा त्यांनीं तयार केला
होता, त्यांत एका विविक्षित पक्षाचें अंतिम साध्य दुसऱ्यावर दडपून त्यांची कांग्रेसमधून
हाकालपट्टी करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. अमुक एक अंतिम साध्य तुम्ही कबूल
करा नाहीं तर ह्या सभेंत तुम्हांस थारा नाहीं, तुह्मी चालते व्हा, हा ना० गो-
खल्यांच्या नव्या नियमांचा अर्थ होता. कांग्रेस मोडण्याचा आमचा इरादाच होता,
असें जे ह्मणतात त्यांस मी असें विचारतों कीं, भिन्नभिन्न मताच्या सर्व लोकांचा
समावेश राष्ट्रीय सभेंत व्हावयास नको काय ? असें असतां गोखल्यांपेक्षां भिन्न
अंतिम साध्य ज्यांचें आहे—पण जें राष्ट्रहिताच्याच मार्गांतलें आहे, त्यांस राष्ट्रीय
सभेंतून हांकून लावण्याचा आमच्या प्रतिपक्षाचा इरादा होता कीं नाहीं ? सर्व-
मान्य होतील । किंवा निदान बहुमान्य होतील तेच ठराव राष्ट्रीयसभेंत पास होतील.
पण एखाद्या पक्षाचीं व आपलीं मतें जुळत नाहींत ह्मणून त्यास गचांडी देण्याचा
प्रयत्न कोणींही करितां कामा नये. असा प्रयत्न राष्ट्रीय पक्षानें केला काय ? आ-
पल्यापेक्षां भिन्न मत धारण करणाऱ्याविषयीं असहिष्णु कोण होते ? राष्ट्रीय
सभेंत दुसऱ्या पक्षाचें अस्तित्व मवाळांस असह्य झालें होतें कीं जहालांस ? प्र-
तिपक्षास हांकून लावण्याची ही युक्ति नेमस्तांनीच केली होती—राष्ट्रीय पक्षानें
केली नाहीं. असें असतां राष्ट्रीयसभा राष्ट्रीय पक्षानें मोडली काय ?



तिसरा महत्वाचा प्रश्न ह्मणजे कांग्रेसच्या पीछेहाटीसंबंधाचा होय. कांग्रेसचा करारीपणा, बाणेदारपणा व स्वावलंबनपणा वाढून कांग्रेसचें पाऊल पुढें पडावें, ह्या हेतूनें आह्मी सर्व नॅशनालिस्ट सुरतेस गेलों. आमचे बंगाली राष्ट्रानें निरुपाय हो-ऊन ज्या खडतर निश्चयाचा—ज्या कडकडीत व्रताचा अंगीकार केला त्या व्रताचा प्रसार इतर प्रांतांत व्हावा, इतर प्रांतांनीं आह्मांस आमच्या राष्ट्रीय झगड्यांत मदत करावी अशी आमची इच्छा होती व आहे. आह्मी हा जो शांतपणाचा—पण निश्चयाचा झगडा मांडला आहे, त्यांत आह्मांस इतर प्रांतांचें सक्रिय साहाय्य मिळावें, अशी आमची महत्वाकांक्षा होती.पण स्वा० कमिटीच्या नांवानें यंदां-च्या ठरावांचे जे विषय प्रसिद्ध करण्यांत आले, ज्या विषयांसाठीं आह्मीं कलकत्ता कांग्रेसमध्यें इतक्या निकरानें झगडलों, त्यांपैकीं एक खेरीज करून बाकीचे सर्व विषय गाळलेले होते ! तेव्हां कांग्रेस पुढें सरकावयाची गोष्ट दूरच राहिली. पण निदान ती आहे तेथें तरी राहते कीं नाहीं, ह्याची आह्मांस चिंता पडली ! विषय अगदींच गाळले होते आणि राष्ट्रीय पक्षाचा अडथळा दिसतांच ते छिन्न भिन्न—पुळपुळित करून मागाहून घालण्यांत आले, किंवा पूर्वीच छिन्नभिन्न विषय घा-लून नावें तेवढीं दडपून टाकण्यांत आलीं होतीं, हें सांगतां येत नाहीं. परंतु सु-रतेस जी विषयांची यादी—मुंबईस ती २५ तारखेस पाठविली गेली असतां—आ-ह्मांस तारीख २६ रोजीं कांग्रेस सुरू झाल्यावर मिळाली, त्या यादींत थोडे पांगळे आणि बुळे बनविलेले विषय आह्मांस आढळले. ना. गोखले ह्मणतात कीं, गु-दस्तांच्या ठरावांत आपण केलेले फेरफार केवळ शाब्दिक—क्षुल्लक असून ते अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ आणि भाषासौष्ठवासाठीं करण्यांत आले होते ! ना. गो-खल्यांसारख्यानें असें विधान करावें हें विचित्र होय ! स्वराज्याचा ठराव गु-दस्तां कलकत्यास पास झाला त्यांत 'वसाहतींतील स्वराज्य' हें अंतिम स्पष्टपणें ठरलें असतां यंदांच्या नियमांत ना. गोखल्यांनीं Creed Resolution घालून तें कसें संदिग्ध व मिळमिळित केलें होतें, हें मीं आपणास सांगितलेंच आहे. स्वदेशीचा ठरावही तसाच छाटाछाट करून पुढें आणलेला आढळला. गुदस्तां 'Even at some sacrifice'—'झीज सोसूनही' हे शब्द घालण्यासाठीं नॅशनालिस्ट पक्षास केवढी खटपट करावी लागली होती! हे शब्द घालून गुदस्तां दोन्ही पक्षांचा समेट ठरला. हे शब्द दोन्ही पक्षांना मान्य

झाले होते. गोखले ह्मणतात हे शब्द नजरचुकीनें राहिले ! ‘ Even at some sacrifice ’ हे शब्द चुकून किंवा विस्मृतीनें ठरावांतून गळतील—आणि तेही गोखल्यांच्या हातून—ही गोष्ट आह्मांस ह्या शब्दाच्या प्राचीन इतिहासाशीं सुसंगत दिसेना. गतवर्षीं स्वदेशीच्या ठरावावर मतभेद झाला त्यावेळीं समेट करण्याकरितां जे उभय पक्षाचे लोक जमले होते, त्यावेळीं हजर असण्याची संधि मला मिळाली होती. आमच्या पक्षाच्या बाजूनें रा० टिळक, अश्विनी बाबू आणि मी असे तिघेजण हजर होतों. विरुद्ध पक्षाच्या बाजूनें ना० गोखले व पंडित मदनमोहन हे हजर होते. आम्हां पांच जणांत वादविवाद होऊन ‘ झीज सोसून देखील ’ हे शब्द ठरावांत घालण्याचा समेट ठरला होता. तेव्हां हडसून खडसून घातलेले शब्द नजर चुकीनें गळले, असें आह्मांस वाटलें नाहीं. दुसऱ्या ठरावांत केलेले अन्वर्थक फेरफार पाहतां, वरील शब्द मुद्दाम गाळले, असें अनुमान केल्यास ना० गोखल्यांचा आह्मीं अन्याय केला, असें होतें काय ? आह्मांला काय ठाऊक कीं ना० गोखल्यांना—एका जनरल सेक्रेटरीला—गुदस्तांचे ठराव बरोबर रीतीनें छापलेल्या कोणत्याही वर्तमानपत्राची फाईल सांपडली नाहीं ह्मणून ? आतां सांगितलेल्या पांच जणांच्या कमिटींत वरील शब्द घातले गेले असतां, ते शब्द गोखले विसरले असतील, असें आह्मांस वाटलें नाहीं, ही गोष्ट खरी आहे ।

बहिष्काराच्या ठरावांत तर धडधडीत अर्थाची हानि होईल, व बंगालनें उचललेलें बहिष्कार शस्त्र फक्त विलायती मालासंबंधानेंच आहे असें दिसेल, अशा बेताची फिरवाफिरव गोखले यांनीं केली होती. Boycott movement inaugurated in Bengal ह्यांत Boycott of British goods resorted to in Bengal ह्यापेक्षां जास्त खास आहे. movement ह्मणजे हालचाल हा अर्थ घेऊन ही बहिष्काराची चळवळ एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूकडे—एका गांवांतून दुसऱ्या गांवांकडे—एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांताकडे प्रवास करील, अशी आशा गुदस्तां बिपिनबाबूंनीं कांग्रेसमध्यें व्यक्त केली. गोखल्यांना हा अर्थ फिरवून तो ठराव डुला करावयाचा नव्हता काय ? बंगाल्यांतील चळवळीकडे जो वरवर पाहील त्यास देखील बंगालची चळवळ ही फक्त ‘ ब्रिटिश मालापुरतीच नव्हती असें दिसून, सरकारानें फाळणी झाली ह्मणून डांगोरा

पिटला, तर आह्मीं ही फाळणी आह्मांस कबूल नाहीं !' असें सरकारास बजाविलें आह्मांस फाळणी कबूल नाहीं, हें दर्शविणारा सर्व प्रकारचा बहिष्कार—निव्वळ औद्योगिक बहिष्कार नव्हे-आह्मीं अंगीकृत केला. आमचा बहिष्कार ह्मणजे अडवणुकीचा मार्ग होता, हें सर्व हिंदुस्थानास माहीत आहे. नुसत्या विलायती मालावरच बहिष्कार असता, तर स्वाभिमानी व बाणेदार बंगाली गृहस्थांनीं आपल्या कौन्सिलांतील जागेचा राजीनामा कां दिला असतां ? बंगालचा बहिष्कार नुसता मालापुरता औद्योगिक बहिष्कार असता, तर सरकारी शाळांना बहिष्कार घालण्याचें काय कारण होतें ? विलायती मालावर बंगालनें बहिष्कार घातला होता, हीही गोष्ट खरी. पण तो बहिष्कार दुसऱ्या एका सर्वव्यापी बहिष्काराचें एक उपांग होतें. येथें एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, 'परकी माला' वर घालावयाचा बहिष्कार हा फक्त 'औद्योगिक' आहे.परंतु फक्त इंग्रजी मालावर घालावयाचा बहिष्कार हा राजकीय स्वरूपाचा आहे. ह्या राजकीय शस्त्रांचा उपयोग ब्रिटनशिवाय इतर देशांच्या विरुद्ध करण्याची आपणांस जरूरी नाहीं. ब्रिटनच्या लोकांनीं आपणावर जुलूम केला, ह्मणून जर्मनी किंवा अमेरिका ह्यांचा सूड काय ह्मणून उगवावा ? जर्मनी किंवा अमेरिका यांचा माल आपण घेत नाहीं किंवा घेणार नाहीं, तो हिंदुस्थानांतील उद्योगधंदे वाढावे ह्मणून होय. पण ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्यांत ह्याशिवाय दुसराही राजकीय हेतु आहे; तो हा कीं, आपणावर जुलूम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या जातभाईस चट्टा बसेल असें करणें हा होय. बंगालचा बहिष्कार हा दुसऱ्या प्रकारचा होता, तरी त्याचें क्षेत्र—त्याची मर्यादा फार विस्तृत आहे. सरकारला अन्यायानें व अनियंत्रित सत्तेनें चालविलेल्या राज्यकारभारांत कोणत्याही प्रकारें आपण साह्य न करणें, हा आमच्या बहिष्काराचा अर्थ होता. हा इतका उघड आहे कीं, तो कोणाही डोळस मनुष्यास दिसण्यासारखा आहे. ना. गोखले ह्यांना आह्मीं बंगाली लोकांनीं अशा प्रकारचाच बहिष्कार सुरू केला आहे, ही गोष्ट माहीत होती. पण त्यांनीं जाणून बुजून बंगालचा बहिष्कार फक्त विलायती मालापुरताच आहे, असें भासविण्याचा प्रयत्न केला किंवा सुरतची कांग्रेस तरी फक्त निदान तेवढ्यापुरतीच बंगालचा बहिष्कार मान्य करते, असें स्पष्ट करण्याचा नामदारांचा हेतु असेल ! गतवर्षींच्या ठरावांत केलेली लबाड आह्मां बंगाली राष्ट्रपक्षीयांच्या दृष्टीनें तरी

पीछेहाटीची व फार महत्वाची होती. असें असतां गोखले ह्मणतात कीं, फिरवाफिरव फक्त शाब्दिक आणि क्षुल्लक होती ! गोखल्यांना ही फिरवाफिरव कितीही क्षुल्लक व शाब्दिक वाटली, तरी बंगाली नॅशनालिस्ट पक्षास ती तशी वाटणें अशक्य आहे. आह्मी बंगाल्यांतील—विशेषतः पूर्व बंगाल्यांतील लोकांनीं ज्या सर्वव्यापी बहिष्काराच्या प्रसारार्थ एवढे हाल सोसले, मुलांनीं फटके खाल्ले, अनेकांनीं तुरुंगांत आपले देह कष्टविले, कित्येकांनीं आपल्या सर्वस्वावर पाणी सोडलें—ह्या बहिष्काराचें हें नामदार गोखल्यांनीं बनाविलेलें रोडकें चित्र आह्मांस बिलकूल पसंत पडलें नाहीं. आमच्या बहिष्कारास नुसतें औद्योगिक स्वरूप देण्याचा नामदारांचा बेत आह्मांस मुळींच कबूल नव्हता. इतर प्रांतांची आह्मांस खरीखुरी सहानुभूति मिळावी ह्मणून आह्मी नेटानें झगडलों, नेटानें हाल सोसले आणि ह्या अडवणुकीच्या मार्गास राष्ट्रीय सभेचें पाठबळ गतवर्षी मिळालें; तें काढून ठराव बोंथट करण्याचा गोखल्यांचा उघड उघड प्रयत्न असतां, ते ह्मणतात कीं फेरफार काय ते शाब्दिकच होते !

राष्ट्रीय शिक्षणाचे ठरावांतील On National lines and under National Control हे महत्वाचे शब्द गाळून त्या ठिकाणीं Independent system हे शब्द घातले. गोखले ह्मणतात कीं, ' नॅशनल नॅशनल नॅशनल, असें ठरावांत तीनदां येत होतें ह्यामुळें ठरावाची भाषा बिघडली होती, ती फिरवून आपण दुरुस्त केली ! गोखले इंग्रजी भाषेचे पंडित आहेत, परंतु नॅशनल शब्दाची त्रिरुक्ति करण्यांत आह्मांस तरी विशिष्ट हेतु दिसतो. स्वतंत्र पद्धतीचें राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे ग्रँट घेतलेल्या निमसरकारी शाळेंतील किंवा कॉलेजांतील शिक्षण होऊं शकेल. परंतु ' राष्ट्रीय पद्धतीवर ' व ' राष्ट्रीय हुकमतीखालीं ' हे शब्दसमूह गोखल्यांना ' अजागळ ' व निरर्थक वाटले ह्मणून वाईट इंग्रजी वाक्य चांगल्या इंग्रजींत आणण्यासाठीं—भाषासौष्ठवासाठीं—त्यांनीं फेरबदल केला ! ह्या फेरबदलामुळें ह्या शाब्दिक क्षुल्लक—भाषासौष्ठवाच्या घोंटाळ्यामुळें सबंध राष्ट्रीय पक्ष नाखुष होईल व झाला हें माहीत असतां एवढें ' वाईट इंग्रजी वाक्यच ' त्यांनीं राहूं दिलें असतें, तर त्यांत त्यांच्या इंग्रजी ज्ञानास थोडाबहुत कमीपणा येण्याप्रेक्षां दुसरी कांहीं फारशी हानि खास झाली नसती ! इंग्रजी भाषा शुद्ध व गोंडस लिहितां यावी हा कांहीं कांग्रेसचा हेतु नव्हे ! थोडीशी खराब भाषा

ठेवण्यानें जर सर्वांचें समाधान होत होतें, तर तेवढी कमतरता राहूं दिल्यानें काय नुकसान होणार होतें ! परंतु ना. गोखले यांनीं इतक्या महत्वाचा फेरबदल केला असतांही तो सर्वांनीं शाब्दिकच समजावा, असें ह्मणणें ह्मणजे राष्ट्रीय पक्ष अज्ञाणी व मंदबुद्धि आहे असें समजण्याप्रमाणेंच आहे.

अशा प्रकारें कांग्रेस मोडण्याचा आमचा संकल्पच होता असें ह्मणणारांपुढें हे तीन प्रश्न आहेत. सभासदांचा भाषणस्वातंत्र्याचा हक्क बुडविण्याचा बेशिस्तवार प्रयत्न कोणीं केला ?–राष्ट्रीयपक्षानें ? कांग्रेसमधून एका विविक्षित मताच्या लोकांना वेगळण्याचा–हांकून बाहेर पाडण्याचा–निंद्य प्रयत्न कान्स्टिटयूशनचे पक्षपाती नियम करून कोणीं केला ? राष्ट्रीय पक्षानें ? सर्वानुमतें पास झालेला ठराव बदलून टाकून स्थानिक बहुमताच्या जोरावर कांग्रेसची पीछेहाट करण्याचा बेत कोणाचा होता ? नॅशनालिस्टांचा ? ह्या महत्वाच्या गोष्टी आहेत. यंदांचें भांडण कांग्रेसमधील अनियंत्रित सत्ता व साधारण लोक यांच्यामध्यें होतें. तें एक प्रकारचें तत्वाचें भांडण होतें.

जी कांग्रेस सरकारच्या अरेरावीच्या विरुद्ध ठराव पास करते तिच्यांतीलच कांहीं लोकांनीं अरेरावी चालविल्यास कसें पचेल ? कांग्रेसमध्यें घोंटाळा झाला, तर तो यंदांच्या विशिष्ट परिस्थितीमुळें झाला. त्यांत टिळकांचा दोष नाहीं; राष्ट्रीय पक्षाचा दोष नाहीं. पुढें एकोपा होईल किंवा नाहीं–व होणें शक्य आहे कीं नाहीं–हें कालांतरानेंच ठरणार आहे. तथापि आमच्या राष्ट्रीय पक्षास भविष्य-काळांत फार मोठें कार्य करावयाचें आहे. वाटेंत अडचणींचे डोंगर आहेत, पर्वत-प्राय संकटें आहेत. हाल अपेष्टा सोसाव्या लागतील, कष्ट करावे लागतील, सर्व-स्वाची आहुति द्यावी लागेल; कित्येकांना देह खर्च करावे लागतील, तेव्हां कोठें आपलें अंतिम व उदात्त ध्येय, सर्व सौख्यांची परिपूर्णता, सर्व साध्यांतील साध्य, सर्व लोकांचें अभीष्ट जें स्वराज्य तें आपणांस मिळेल. भविष्य काळांत जें आपणांस काम करावयाचें आहे, त्यासंबंधें उद्यां बोलेन. ”

## व्याख्यान सहावें.

# भविष्यकाळांतील काम.

माझे देशबांधवहो, ज्यांनीं डोळे नीट उघडे ठेऊन गेल्या दोन वर्षांपूर्वी सुरू झा-

लेल्या चळवळीकडे बारकाईनें पाहिलें असेल,त्या चळवळींत-त्या विचार क्रान्तींत-त्या आचारांच्या अस्मानी सुलतानींत केवढा जोम आहे, हें ज्यांच्या लक्षांत आलें असेल, त्यांची ह्या चळवळीच्या पाठीमागें कांहीं तरी अदृश्य,अद्भुत, दिव्य, ईश्वरी शक्तीचें पाठबळ आहे, ह्याबद्दल खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. हीं चळवळ कांहीं सामान्य चळवळ नव्हे, ह्या चळवळीचा नियामक आणि नायक कोणी मनुष्य प्राणी खास नव्हे, ह्या चळवळीला जगांतील श्रेष्ठतम सामर्थ्याचा आधार आहे, जगांतील सर्व क्रांत्या ह्या विलक्षण शक्तीनेंच घडवून आणलेल्या आहेत. कांहीं तरी अलौकिक-अमानुष शक्ति राष्ट्रांत स्फुरण पावूं लागली आहे. ज्यालोकांनीं-मुठभर वेड्या लोकांनीं-ही चळवळ सुरू केली ते लोक अप्रसिद्ध होते. ही चळवळ महाप्रसिद्ध कसलेल्या पुढाऱ्यांनीं सुरू केलेली नव्हे. परंतु आतां पुढाऱ्यांना ह्या ओघांत मिसळावें लागलें. अप्रसिद्ध लोकांनीं सुरू केलेल्या या चळवळीच्या प्रवाहांत मोठमोठे पुढारी वहात चालले आहेत ! अशी या प्रवाहांत अनिरुद्ध शक्ति आहे. ह्या चळवळीमुळें शेंकडों वर्षांत न होणारी लोकजागृति दोन वर्षांत घडवून आणली आहे. चळवळींत पडलेले लोक मोठे विद्वान होते असें नाहीं. ते इतर माणसांप्रमाणें सामान्य मनुष्य होते. त्यांच्या हातून अनेक प्रमाद झाले, अनेक चुका झाल्या; परंतु आश्चर्य हें कीं या चुकीमुळें चळवळीचा पाय मागें न हटतां अप्रतिहतपणें पुढेंच चालला आहे. किंबहुना ह्या चळवळीचें संपूर्ण सामर्थ्य आपणा क्षुद्र मानवांच्या विचारशक्तीस गोचर होण्यासारखें नाहीं. ह्या चळवळीच्या लाटेच्या शिरोभागावर आरूढ होऊन कांहीं समान्य लोक—आपल्या उज्वळ राष्ट्रभक्तीनें व कळकळीनें, आपल्या अद्वितीय स्वार्थत्यागानें व कर्तव्यनिष्ठेनें—उच्चपदास पोंचले आहेत—सर्व राष्ट्रास वंदनीय झाले आहेत ! आमच्या प्रतिपक्षाचा भडकलेला राग, आपसांतील भांडणें, चुगलखोरांच्या चुगल्या आणि घरबुडव्या घरभेद्यांचा विश्वासघात-मात्रागमनीपणा—ह्यांच्या योगानें ह्या चळवळीचा ओघ थांबला नाहीं, तिचा वेग कमी झाला नाहीं. ही चळवळ एखाद्या प्रचंड नदीच्या लोंढ्याप्रमाणें जें जें तिच्या सपाट्यांत सांपडेल त्याला पुढें ढकलीत चालली आहे. आजपर्यंत पृथ्वीवरील अनेक राष्ट्रांत विलक्षण धर्मक्रांत्या झाल्या आहेत. तशाच प्रकारची ही एक क्रांति आहे. ही क्रांति राजकीय वातावरणांत चालली आहे. हा राष्ट्राच्या राजकीय उन्नतीचा आरंभ आ

ह्या प्रवाहाच्या लोंढ्यावर बसून हिंदी समाज हा निमित्त मात्र होत्साता ईश्वरी इच्छेचें अनुपालन ईश्वरी आज्ञेचें परिपूरण निसर्गत: करीत आहे. समाजाच्या पोटांत सुरू झालेली ही खळबळ कांहीं तरी दैवी कार्य घडवून आणणार यांत शंका नाहीं. ही चळवळ मानवी इच्छेनें खास चाललेली नाहीं. आम्ही सुरतेस एका विशिष्ट हेतूनें गेलें.आम्ही आमच्या मतांची व आमच्या तत्वांची प्रगति व्हावी म्हणून कांग्रेसला गेलों; परंतु तेथें निराळाच प्रकार घडून आला ? आमचे प्रतिपक्षीही आपल्या बाजूचा वर्चष्मा करण्यासाठींच तेथें जमले पण त्यांचाही तसाच मनोभंग झाला ! ही आकस्मिक फाटाफूट कदाचित ईश्वरी संकेतानें--राष्ट्राच्या कल्याणासाठींच घडून आली नसेल--असें तरी कसें म्हणावें ? परमेश्वराचे हेतु अतर्क्य असतात; त्याची लीला अगम्य आहे. ऐक्य अवश्य आहे, ऐक्य पाहिजे. परंतु ह्या दुहीनेंच राष्ट्राचा उद्धार करण्याचा ईश्वरी संकेत असेल काय ? असेलही; कोणीं नाहीं म्हणावें ! उभय पक्षांचा समेट व्हावा; अशी सर्वांची इच्छा आहे. पण पुढें काय होणार हें कोणीं सांगावें ? परंतु राष्ट्रीय पक्षाला ह्यापुढें जें काम करावयाचें तें मात्र फार भयंकर आहे. आपल्या पक्षाच्या सामर्थ्याची आणि चिवटपणाची आज परीक्षा होणार आहे. आतां आपल्या पक्षाचें सत्व कसोटीस लागणार आहे. ह्यासाठीं आपण काय कार्य हातीं घेतलें आहे; आम्हांला कोठें जावयाचें आहे; वाटेंत केवढे खड्डे आणि विघ्नें आहेत; आपल्या ठायीं किती ताकद आहे, आपल्या ठिकाणीं किती दौर्बल्य आहे, कोणत्या मार्गानें आपणांस गेलें पाहिजे ह्या सर्व गोष्टींचा अंदाज आतां आपणांस केला पाहिजे. इतके दिवसांचें आपसांतील भांडण हा फक्त बौद्धिक वादविवाद होता. राष्ट्राच्या अंगांत चेतना ओतावयास त्याची जरुरी होती---आजपर्यंत आपली ताकदही थोडी होती व ती ह्या वादविवादांत खर्च होत होती. आपल्या राष्ट्राच्या अंगांत असलेल्या शक्तीचा नीट अंदाज कोणास झाला नाही. ह्या शक्तीचें एकीकरण करण्याचा कोणीं यत्न केला नाहीं, पुष्कळांना ह्या शक्तीचा विश्वास अद्याप वाटत नाहीं, पुष्कळांची खात्री पटत नाहीं, पुष्कळ असामी इकडें तिकडे घोंटाळत आहेत, असा प्रकार असल्यामुळें आज दोन पक्ष झाले आहेत. आमच्या पक्षाच्या एकट्याच्याच हातून कार्य घडवून आणावयाचें असा तर संकेत नसेल ! आमच्या सामर्थ्याचा अंत पाहण्याची तर ईश्वरी इच्छा

नसेल !–हल्लींचा काळ मंद मंद प्रगतीचा नव्हे.हा अत्यंत शीघ्र आतिशय सपाट्या-च्या प्रगमनाचा काळ आहे. प्रत्येकानें ह्यावेळीं पुढें घुसलें पाहिजे. धैर्य पाहिजे, साहस पाहिजे,धीटपणा पाहिजे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळच्या एका लेखकानें ह्मटलें आहे " घाबरून टाकण्यासारखें कांहीं नाहीं. निष्ठा ठेऊन पुढें धांवा—चला, पळा, सरका ! " जपान व जर्मनी येथेंही अशीच शीघ्र प्रगति झाली. कदाचित आपलें ऐक्य घडवून आणण्याचे प्रयत्न निष्फळही होतील ! तेव्हां काय मिळवावयाचें याचा निर्णय आपणास ठरविला पाहिजे. कांग्रेसचे जुने भक्त नेमस्त लोक यांचा मार्ग भिन्न होता. त्यांना हल्लींची राज्यव्यवस्था सर्वस्वी बदलून टाका-वयाची नव्हती. त्यांना क्रांति करावयाची नव्हती. त्यांना आहे यांतच सुधारणा करावयाची होती. त्याला धैर्याची जरूरच नव्हती. पण त्या मार्गानें कार्यही घडून आलें नाहीं. हक्क मिळणें शक्य नाहीं. नुसतें सुराज्य स्वराज्याची तहान भागवूं शकत नाहीं. आपली राष्ट्रीय जबाबदारी—राष्ट्रीय कर्तव्यें जर आपण परक्यांवर लोटूं लागलों तर तो केवळ राष्ट्रीय मृत्यु होय, ती महाविपत्ति होय.आपलें सौख्य आपला सुरक्षितपणा ज्यांना पाहिजे असेल, त्यानें आमच्या मार्गांत पाऊल ठेऊं नये. अंगचोरांची आह्मांस जरूर नाहीं. परक्यांच्या कृपेनें त्यांचे जवळूनच तुह्मी कसें राज्य मिळवाल ! तुमचें त्यांचें हिताहित भिन्न भिन्न आहे. ज्यांना द्यावयाचें त्यांनीं हळूहळूच कां द्यावें ? सरकार हळूहळू सुद्धां स्वराज्याचे खरे हक्क आपणास देणार नाहीं. थोडें दिलें तर जास्त मागतील ही भीति त्यांना आहेच. सरकारला हक्क द्यावयास पाडूं असें ह्मणणें ह्मणजे पूर्ण स्वराज्य मिळविण्याची महत्वाकांक्षा धरण्याइतकेंच धोक्याचें आहे. स्वराज्याचे हक्क मि-ळविण्यासाठीं जगांतील प्रत्येक राष्ट्रानें जे उपाय योजले तेच उपाय परिस्थितीला अनुसरून आपणासही योजले पाहिजेत. वसाहतीचें स्वराज्य हें अंतिम साध्य अर्धवट व अस्पष्ट आहे. त्यामुळें चळवळीचा परिणामही अर्धवट व अस्पष्ट असाच होतो. अन्तिम साध्य श्रेष्ठतम असेल, उदात्त असेल, स्फूर्तिजनक असेल तरच कार्यकर्त्या लोकांना आवेश येतो, स्फूर्ति उत्पन्न होते. ह्मणून अत्यंत उच्च असेंच ध्येय आपणांपुढें ठेविलें पाहिजे. ह्या ध्येयाकडे–पूर्ण स्वराज्याकडे आपणाला प्रवास करावयाचा आहे. वारंवार आपणास असें हिणविण्यांत येतें कीं, स्वतंत्र स्वराज्याची उडी ह्मणजे नुसतें स्वप्न आहे, नुसतें मनोराज्य आहे

कारण आपला समाज दुर्बळ निःसत्व विसकळीत खिळखिळा झालेला आहे. आपल्या समाजांत असलें महत्कार्य संपादण्यास लागणारें धैर्य कोठें आहे ? सामर्थ्य कोठें आहे आणि स्वार्थत्याग व आधिभौतिक साधनें तरी कोठें आहेत ? स्वराज्य संपादण्याचें काम मानवी शक्तीच्या बाहेरचें आहे ह्मणून कांहीं शतकें थांबा, कांहीं दिवस काम करा, आणि मग स्वराज्याच्या गोष्टी बोला. असा कित्येकांचा उपदेश आहे. परंतु परकीयः अंमलाला साहाय्य करून कोणतेंच राष्ट्र उदयास आलें नाहीं. स्वतंत्रतेचे धडे स्वतंत्रतेच्या शाळेंतच शिकले पाहिजेत. यापुढें कांहीं शतकें थांबल्यास आपल्या राष्ट्राची दुर्बलता मात्र वाढेल; आतां थांबण्याची सोयच नाहीं. मिळवावयाचें असेल तर आतांच प्रयत्नाला लागा नाहीं तर स्वराज्याचें नांव कायमचें सोडून द्या.

हिंदुस्थानांतील सध्यांची चळवळ ही बंगाल्यांत एकाएकीं उदयास आली. ह्या चळवळीनें बंगालचें सर्व स्वरूप पालटून टाकिलें आहे. प्रत्येक अंतःकरणांत परमेश्वरी प्रेरणेनें स्फूर्ति उत्पन्न झाली आहे. ही ईश्वरी योजनाच असली पाहिजे. एरवीं थोड्याशा अप्रसिद्ध लोकांच्या चळवळीनें दोन वर्षांत अमानुष कार्यें कसें घडून येतें ? आपण कदाचित बंगालच्या चळवळीचें लक्षपूर्वक निरीक्षण केलें नसेल. बंगालची चळवळ ही थोड्याशा लोकांनीं प्रथम सुरू केली. ह्या प्रवर्तकांना लोक वेडेपीर समजत. पण ह्या वेड्या पीरांनींच स्वदेशीचा प्रचार वाढविला, बहिष्काराचा उपदेश केला, आखाडे स्थापन केले. त्यामुळें चळवळीचा डोंबाळा चोहोंकडे पसरला, सर्व तरुण पिढी चळवळीला साह्य झाली. सगळें बंगाल सजीवन झालें. बंगाल कान वर करून ऐकूं लागलें. पुढाऱ्यांचा बहिष्कारावर भरंवसा नव्हता. तथापि त्यांना लोकमताच्या जोरापुढें टिकाव धरवेना. बहिष्काराचे चळवळींत तो सामील झाले. सरकारी अधिकारी घाबरून गेले. चळवळीचीं हाडें घुसळण्यासाठीं त्यांनीं दडपशाहीच्या धोरणास सुरवात केली. पहिल्यानें गदा विद्यार्थ्यांवर आली. स्वदेशी मालाचा प्रसार होण्यास कसून मेहनत विद्यार्थ्यांनींच केली होती. विद्यार्थ्यांस दंड होऊं लागले, शिक्षा होऊं लागली, त्यांची झाळेंतून हाकालपट्टी होऊं लागली परंतु त्यांना स्वदेशी व्रत सोडावयाचें नसल्यामुळें त्यांनीं शाळा सोडल्या. त्यामुळें राष्ट्रीय शाळा काढाव्या लागल्या. रंगपूर, डाका इत्यादि ठिकाणीं भराभर

राष्ट्रीय शाळा उघडल्या. बंगालचें **राष्ट्रीय शिक्षण मंडळ** प्रस्थापित झालें, जरूरी उत्पन्न होतांच कांहीं साधनें उपलब्ध नसतांही शाळा निघाल्या. फंड नाहीं; शाळागृह नाहीं; सामानसुमान नाहीं. पण बंगाली राष्ट्राच्या सहानुभूतीमुळें आज सर्व संस्था उत्तमप्रकारें चालूं लागल्या आहेत. मुलें 'स्वदेशी' करितां मार खात आहेत, तुरुंगांत जात आहेत, फटके सोशीत आहेत, हाल अपेष्टा भोगीत आहेत. आजपर्यंत बंगाली राष्ट्र ह्मणजे नेभळें अशी सर्वांची समजूत होती. एका इंग्रज गृहस्थाचें असें मत आहे कीं—वाङ्मयाच्या अभ्यासांत बंगाली लोक मोठे हुशार आहेत, त्यांपैकीं एकएकटा घेतला, तर तो फार कर्तृत्ववान व बुद्धिवान् आहे. पण राष्ट्र या दृष्टीनें पाहतां बंगाली लोकांत कांहीं जीव नाहीं. बंगाल्यांच्या हातून मातीसुद्धां होणार नाहीं!पण स्वदेशी चळवळीपासून ही सगळी स्थिति बदलली आहे. उक्ति आणि कृति ह्यांमधील अंतर नाहींसें झालें आहे. सर्व राष्ट्रभक्त—जणूं काय एक पुरुष आहे, अशा प्रकारें एकाच विचारानें हालत आहेत. आमच्या तरुण पिढीला प्राणांची फिकीर वाटेनाशी झाली आहे. मौलवी लियाखत ह्यांचें कांहीं एकच उदाहरण नाहीं. अशीं उदाहरणें अनेक आहेत. मौलवी लियाखत ह्यांना धड बंगाली भाषाही येत नाहीं. पण त्या धीरोदात्त पुरुषानें जी मेहनत केली, जो स्वार्थत्याग दाखविला, तो अवर्णनीय होय! त्याच्यावर आज ३ खटले लोंबकळत आहेत. परवांची ३ वर्षांची शिक्षा त्यानें हांसतमुखानें स्वीकारली, इतकेंच नव्हे तर स्वदेशासाठीं आपणास देह कष्टविण्याची संधि दिल्याबद्दल त्यानें मॅजिस्ट्रेटचे आभार मानिले! आणि कदाचित पुन्हां जगांत परत न येण्यासाठीं मौलवी साहेब तुरुंगांत गेले आहेत! युगांतर वर्तमानपत्राची गोष्ट तर फारच विलक्षण आहे. एका एडिटरास १ वर्षाची सक्त मजुरीची शिक्षा झाली तों दुसरा आला. त्याच्यावरही खटला होऊन त्यास शिक्षा होते न होते तोंच तिसरा पुढें आला; व मॅजिस्ट्रेट बजावीत असतांही मोठ्या खुषीनें त्यानें संपादकत्व आपल्या आंगावर घेतलें! त्याच्या मागून चवथा आला. पण पत्र तसेंच चालू राहिलें आहे. एकाला शिक्षा झाली, तेव्हां त्याला काळजी पडली कीं, पत्र पुढें कसें चालणार?—त्याला बायकामुलांची आठवण पहिल्यानें झाली नाहीं! युगांतर पत्र अशा प्रकारें अजून सुरू आहे! अशा प्रकारें बंगाली लोक "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" ह्या दुःखी

स्वार्थाचा व सर्वस्वाचा होम करीत आहेत. बंगालचा राष्ट्रीय पक्ष कचरला नाहीं. त्यानें कधीं कचर खाल्ली नाहीं. गॅरिबाल्डीच्या पूर्वी इटाली देश म्हणजे फक्त एका भूगोलांतलें नांव होतें. पण २० वर्षांत तें थोर राष्ट्र झालें. तसाच प्रकार बंगाल्यांत चालला आहे. बंगाली तरुणांच्या अंगचें दैवी तेज स्पष्टपणें बाहेर पडलें आहे. ईश्वरी अंश प्रकट झाला आहे. एकाला सरकारानें उचलावा, तोंच त्याच्या ठिकाणीं दुसरे १०० तयार होतात. मी आपलें सर्वस्व ३० कोटी लोकांच्या सुखासाठीं खर्चीन असें बंगाली राष्ट्रभक्तांस वाटूं लागलें आहे. **ही भावना सर्वत्र पसरली पाहिजे.** हिंदी राष्ट्राचें सुख तें माझें सुख; त्याचें दुःख तें माझें दुःख असें वाटलें पाहिजे. दुःख व यातना सोसण्यांत धन्यता वाटली पाहिजे. अशा यातना सोसणें म्हणजे राष्ट्राचें ऋण फेडणें होय.

**स्वार्थत्यागाशिवाय** राष्ट्रें उदयास येत नाहींत. राष्ट्राचें ऋण देण्यास कोणी भागुबाईपणानें माघार घेतां कामा नये. अंगचोरी, हातचलाखी, किंवा नाटकीपणा नको आहे. पोक्त सावधगिरीचे, जपूनजपून योजावयाचे, मोजके उपाय चालावयाचे नाहींत. **पुढें घुसलें पाहिजे.** राष्ट्राभिमान हाच आमचा धर्म, स्वार्थत्याग हेंच आमचें कर्म. आमच्यांतील दैवी गुणांचा विकास होण्यास पूर्ण अवकाश दिला पाहिजे. क्षुद्र विकार सोडले पाहिजेत. तुम्हांला ही ऋण देण्याची पाळी येईल, तर भिऊं नका, हटूं नका, राष्ट्राकरितां दुःख सहन करा. तुमच्या मागें परमेश्वर आहे. तसें तुम्ही कराल, तर हिंदी राष्ट्र हांहां म्हणतांना आपलें प्राचीन वैभव व तेज संपादन करील. तें जगांतील स्वतंत्र राष्ट्रांचे पंक्तीला जाऊन बसेल; सगळ्या जगास शिक्षण देईल; सत्यज्ञानाचा प्रकाश दाखवील, वेदांताचे सिद्धांत सांगेल. सर्व जगाचें आणि मानव जातीचें कल्याण करण्यास आमचें राष्ट्र पुढें येईल. त्याच्या पुढें सारें जग थरथरां कांपेल ! पण केव्हां ? आपण सगळे राष्ट्राचें ऋण देण्यास तयार होऊं तेव्हां ! आपण माझा जो सत्कार केला त्याबल मी आपला अत्यंत आभारी आहें. हा सत्कार माझा नसून तुमची व माझी मातृभूमि इचा हा माझ्या मध्यस्थीनें आपण सत्कार केला आहे. मी ज्या ज्या ठिकाणीं गेलों तेथील लोकांनीं जो विलक्षण उत्साह दाखविला त्यावरून राष्ट्रीय विचार लोकांच्या हृदयांत प्रदीप्त झाले आहेत असें स्पष्ट दिसत आहे. दोन वर्षांपूर्वी आपण कसे होतों, लोकांना कोणत्या गोष्टी आवडत होत्या व आज त्यांच्या

सवलती परकी व्यापाऱ्यांस दिल्या. आमच्या मारवाडी बंधूंना हें समजावयास पाहिजे होतें. त्यांनीं समजून किंवा अज्ञानयुक्त हट्टीपणानें देशाचें नुकसान केलें. व परमेश्वरानें—न्यायी परमेश्वरानें—त्यांना त्याबद्दल शासनही केलें. 'माझ्या लेकरांच्या हिताविरुद्ध वागणारांना दंड केल्याशिवाय त्यांना बोध होणार नाहीं' असा विचार करून सर्वशक्तिमान परमेश्वरानें त्यांच्यावर प्रसंग आणला. मारवाडी लोक बहुधा जैन आहेत. पारसनाथाची टेंकडी सरकारनें स्वाधीन करून घेतली. व ज्या ठिकाणीं देवाची भक्ति करण्यास लोक धांवत त्या ठिकाणीं आतां पुढें साहेबाचे बंगले उठून नाचतमाशे, अभक्ष्यभक्षण व अपेयपान होत राहील. जैन लोकांच्या विनंत्या, त्यांचे अर्ज, डेप्युटेशनें यांची सरकारास काय पर्वा ? ज्यांना फायदा व्हावा ह्मणून मारवाडी लोक स्वजनद्रोह करण्यास उद्युक्त होतात, ते मारवाड्यांची काय तरतूद ठेवतात हें पाहून तरी त्यांचे डोळ्यांत अंजन पडावें, ह्मणून परमेश्वरानें ही योजना केली असली पाहिजे ! संकटापासून मारवाड्यांनी बोध घेतला पाहिजे व प्रभूच्या संकेताप्रमाणें वागण्यास तयार झालें पाहिजे. परकी लोक काय करतात तें पहा ! हिंदुस्थानांत व्यापारासंबधीं होत असलेल्या नुकसानाची भरपाई होऊन व्यापारविषयक समतोलपणा (Cmmercial balance) दाखवा ह्मणून तुमचे सहस्रावधी देशबांधव आफ्रिकेंत गेले त्यांचे काय हाल होत आहेत ? अत्यंत जुलमी व अमानुष कायदे त्यांचेवर लादण्यांत येऊन त्यांना पशूप्रमाणें वागविण्यांत येत आहे व त्यांचे तेथील व्यापारविषयक वर्चस्व नष्ट करण्याचे सैतानी उद्योग चालू आहेत. यासाठीं सर्व व्यापार आपल्या हातीं घेणें अवश्य आहे व यासाठीं आमच्या धनाढ्य लोकांनीं कंबरा बांधल्या पाहिजेत. धनव्ययाचा मार्ग बदलला पाहिजे Commercial Swaraj व्यापारविषयक स्वराज्य मिळविण्यासाठीं हे उद्योग जारीनें केले पाहिजेत. या मार्गांत अडचणी येतील नुकसान होईल परंतु त्यास इलाज नाहीं. देशाचें नष्टचर्य संपविण्यासाठीं हे सर्व हाल सोसलेच पाहिजेत. ह्मणूनच तरुणांच्या मनांत हे विचार भरवून देणाऱ्यासंस्था निर्माण झाल्याच पाहिजेत. आमच्या बंगाल्यांत व तुमच्या शहरांत राष्ट्रीय शिक्षणसंस्था निर्माण करण्याविषयीं उद्योग होत आहेत हें सुचिन्ह होय. बंगाल्यांत पुष्कळ ठिकाणीं अशा संस्था अस्तित्वांत येत आहेत. उगाच पोपटपंचीच्या मार्गानें अनवश्यक शिक्षण देऊन तरुण लोकांच्या

बुद्धीचा व बलाचा अपव्यय करणारें शिक्षण नको आहे. स्वसंरक्षण व देशभक्ति यांचा मनोहर संगम करतां आल्यास फार उत्तम, पण सरकारच्या हलक्या दर्जाच्या नोकऱ्या करून पोट भरण्याविषयीं आसक्ति बाळगून सर्व राजकीय नीतिमत्तेचा व राष्ट्रीय उन्नतीच्या कल्पनांचा खग्रास करणारें विषारी शिक्षण आतां आमच्या मुलांना क्षणभरही नको आहे. राष्ट्रीय पद्धतीवर राष्ट्रीय सत्तेखालीं (On National lines and under National Control) शिक्षण देण्यांत आलें पाहिजे. राष्ट्रीय चैतन्याचा विकास करणारें व स्वत्व विसरून मी माझ्या देशाकरितां, मला स्वतंत्र अस्तित्व नाहीं, अशी उच्चतम कल्पना मनांत ठसविणारें खरें शिक्षण होय. National lines and National control हे शब्द ह्मणूनच महत्वाचे आहेत व हे शब्द राष्ट्रीयसभेच्या ठरावांत असले पाहिजेत असा आह्मीं जो आग्रह धरतों तो यासाठींच. राष्ट्रीय शिक्षणाचें हें काम श्रीमंत लोकांनीं व विद्वान थोर पुरुषांनीं मनवर घेतल्याशिवाय होणें शक्य नाहीं. धनिकांचा पैसा या मार्गानें गेल्यास त्याचें पूर्ण चीज झाल्याशिवाय रहाणार नाहीं. भावी प्रजा सुदृढ व शरीरानें आणि मनानें खंबीर होण्यासाठीं सर्वांनीं अंतःकरणपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत, देशाच्या अत्यंत अप्रसिद्ध ठिकाणीं देखील ही राजकीय कल्पनांची लाट पोहोंचविली पाहिजे. मागें पहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. व्यापारविषयक स्वराज्य, शिक्षणविषयक स्वराज्य तुह्मी काबीज केल्यावर राजकीय स्वराज्याचा मार्ग सोपा आहे !



मनस्थितींत किती अंतर झालें आहे याचा विचार उत्साहजनक आहे. बंगालच्या लोकांनीं स्वदेशी चळवळ उपस्थित केल्यापासून लोकांच्या वर्तनांत उदात्त स्वार्थत्यागबुद्धीचा उद्भव झाला आहे. पूर्वी स्वदेशी चळवळ नव्हती असें नाहीं. श्रीमान बंगाल्यांनीं चळवळीच्या पूर्वी स्वदेशी कंपन्या काढल्या होत्या. परंतु त्या निघतांच युरोपियन कंपन्यांनीं आपले दर कमी करून स्वदेशी मंडळ्यांचें नुकसान केलें. आपला माल महाग असूनही तोच घेण्याचा निश्चय करण्यास लावणारा निग्रह, स्व देशाविषयींची कळकळ त्यावेळीं निर्माण झाली नव्हती. राष्ट्रीय चैतन्याचें पाठबळ नसल्यानें त्या काळीं स्वदेशी धंद्यांस यश आलें नाहीं. बंगालचे निमित्तानें हा राष्ट्रीय आत्मा सर्वत्र संचारला आहे. स्वदेशी मालाच्या बरेवाईटपणाकडे किंवा किंमतीकडे न पहातां स्वदेशीचा अंगीकार लोक करूं लागले आहेत. स्वदेशी जहाजाच्या कंपन्याचे दर विलायती कंपन्यांपेक्षां दुपटी तिपटीनें जास्त असतां स्वदेशी कंपन्यांचाच देशभक्त लोक आश्रय करतात हा या नवशक्तीचा परिणाम होय. तरुण लोकांनीं बंगाल्यांत काय उद्योग केले आहेत हें सर्वश्रुत आहे. बहिष्काराचा उद्योगही त्याच लोकांनीं केला आहे. स्वदेशी माल विकत घेऊन खेड्यापाड्यांतील लोकांना स्वदेशी माल कोणत्याही तऱ्हेचा फायदा न घेतां मूळच्या किंमतीस त्यांनीं विकला आहे. अशा वेळीं मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं, गिरणीवाल्यांनीं, व कलकत्याच्या मारवाड्यांनीं, या प्रसंगीं जर आह्मांस मनापासून मदत केली असती तर स्वदेशी चळवळ व बहिष्कार आज निराळ्या स्थितींत असते. मुंबईच्या गिरणीवाल्यांनीं स्वदेशी चळवळीचा फायदा घेऊन भाव वाढविले व प्रत्यक्ष आमच्या कार्यांत विघ्न आणलें. व आह्मांला तोच महाग माल घेणें प्राप्त झालें. आमच्या मारवाडी बंधूंनीं इंग्रजी माल विकून दलालीचा आपला रोजगार मुळींच सोडला नाहीं. त्या-मुळें बाजार स्वाधीन करून घेण्यास फार प्रयास करावे लागले. इंग्रजी मालावर बहिष्कार घालणें अत्यंत जरूरीचें आहे. इंग्रजी लोकांनीं तुमच्या मालावर बहिष्कार घातला नाहीं काय ? शंभर वर्षांपूर्वी तुमचे उद्योगधंदे ऊर्जितावस्थेंत होते व सर्व हिंदुस्थानला पुरून तुमचा माल परदेशीं जात होता. परंतु वेडेवांकडे कायदे करून तुमचा माल आपल्या बाजारांत येऊं न देण्याची त्यांनीं व्यवस्था केली व उलट पक्षीं आपला माल येथील बाजारांत भरावा ह्मणून हव्या तशा

यांच्या सयाजीराव गायकवाडांशीं व यांची गांठ पडून सयाजीरावांनीं बडोद्याच्या सिविल सर्विसमध्यें यांची नेमणूक केली. कांहीं वर्षें गायकवाड सरकारच्या खाजगी कारभाऱ्याचें काम केल्यावर यांना बडोद्याच्या कालेजाचे व्हाइस प्रिन्सिपाल नेमण्यांत आलें. या जागेवर असतांना यांना दरमहा ७०० रुपये पगार मिळत होता. १९०६ सालीं बंगाल्यांत राष्ट्रीय कालेज निघावयाचें ठरलें व तेथील व्यवस्थापकांनीं अरविंद बाबूंना आमंत्रण दिलें. त्याबरोबर राष्ट्रकार्यार्थ ७०० रुपयांची नोकरी–सयाजीराव गायकवाड जाऊं देण्यास तयार नस-तांही–सोडून ते कलकत्त्यास गेले. ७०० रुपये पगार असतांना अरविंद बाबूंच्या जवळ कांहीं शिल्लक रहात नसे इतके ते उदार होते. आतां तर त्यांनीं आपला खाजगी खर्च दरमहा पन्नास रुपयांच्या आंत आणून ठेवला आहे असें सांगतात. गेल्या सालच्या आगष्ट महिन्यांत यांच्यावर खटला झाला तेव्हां राष्ट्रीय काले-जच्या प्रिंसिपालच्या जागेचा यांनीं राजीनामा दिला. परंतु परमेश्वरकृपेनें खटल्यांतून मुक्त झाल्यावर यांना पुन्हां बोलावण्यांत आलें व सध्यां ते तेथें प्रोफे-सर आहेत. अरविंद बाबूंचे दोघे बंधूही विलायतेस शिक्षणाकरितां गेले होते. एक कलकत्त्यास प्रेसिडेन्सी कालेजामध्यें इंग्रजी भाषेचे प्रोफेसर आहेत, आणि दुसरे कुचबिहारच्या महाराजांचे खाजगी कारभारी आहेत. अरविंद बाबू लहानपणापासून विलायतेच्या वातावरणांत इतके वाढलेले होते कीं, त्यांना बंगाली भाषा समजत असली तरी गेल्या सालापर्यंत बोलतां येत नव्हती! इतका परकी संस्कार झालेला असून देखील त्यांची स्वदेशभक्ति लोकोत्तर आहे ही गोष्ट अर्ध्या हळकुंडानें पिवळे होणाऱ्या विलायतयात्रेकरूंनीं मनन करण्यासारखी नाहीं असें कोण ह्मणेल?

---

# श्रीयुत अरविंद घोस यांचीं महाराष्ट्रांतील व्याख्यानें.

## व्याख्यान पहिलें.

## बंगाल्यांतील राष्ट्रीय चळवळ.

( पुणें येथें गायकवाडाचे वाड्यांत सोमवार तारीख १२ जानेवारी १९०८ रोजीं सायंकाळीं रा. अण्णासाहेब पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं झालेलें व्याख्यान ).

सभ्य गृहस्थहो, माझ्याबद्दल आपणांस जें प्रेम वाटत आहे त्यामुळेंच मी भाषण करण्यास उभा राहिलों आहें. मी तुमच्या हातांत सांपडल्यावर तुह्मी मला व्याख्यान देण्याचा हुकूम कराल अशी पुण्यास येतांना माझी कल्पना नव्हती. मी आपल्या मित्रांस भेटून अगदीं मुकाट्यानें परत जाणार होतों. पण मला व्याख्यान देण्याबद्दल हुकूम झाला. हुकूम ह्मणण्याचें कारण असें आहे कीं, मी वक्ता नाहीं. माझें शस्त्र जिव्हा नसून लेखणी आहे. वास्तविक मी अगदीं कोनाकोपऱ्यांत असावयाचा, परंतु दयाळू सरकारानें मला लोकांपुढें ओढून आणलें आहे. आपल्या देशांत सार्वजनिक चळवळींमध्यें पडणाऱ्या माणसास दोन गोष्टींची वारंवार जरूर पडते. एक तर राजेसाहेबांच्या भोजनालयाचा पाहुणचार स्वीकारणें, व दुसरी लोकांनीं भाषण करण्याचा आग्रह केल्यावर भाषण करणें. जेथें जेथें मी जातों तेथें तेथें मला भाषण करण्यास सांगतात. त्याप्रमाणें येथेंही सांगण्यांत आलें. मी आतां बोलणार काय हें माझें मलाच समजेना. माझे विचार मला जुळवून सांगतां येत नाहींत. पण आपलें मजवर जें प्रेम आहे त्यावर भरंवसा ठेवून मी कांहीं तरी बोलतों. अर्थांतच मी आपणांस फार वेळ त्रास देणार नाहीं. कदाचित् या विषयामध्यें मी वहावलों तर गोष्ट निराळी पण न वहावण्याविषयीं मी काळजी घेईन. नुकताच मला एक विचार सुचला व त्यावरून मी आतां बोलणार आहें. बंगालमध्यें जो एक विचार आह्मांस प्रिय वाटतो

ग्रेसमध्यें या गोष्टीचा अगदीं कळस झाला. कांहीं लोक शांतवृत्तीचे असतात, त्यांना हें वर्ष कमनशीबाचें वाटेल. या वर्षी आपला देश कांहींशा भयंकर व कडक परीक्षेमधून उतरला आहे. " कांहींशा " ह्मणण्याचें कारण असें कीं, इतर देशांवर जे जे प्रसंग गुदरले व त्यांमधून ते ज्या ज्या तऱ्हेनें पार पडले त्यांच्या मानानें आमच्या देशाला खरी परीक्षा मुळींच द्यावी लागली नाहीं. पण आपल्या पूर्वीच्या संवयींकडे पहातां मात्र हा प्रसंग भयंकर व कडक होता एवढेंच. विशेषतः बंगाल्यामध्यें आह्मांला फार संकटें सोसावीं लागलीं. सर्व देशावर पुष्कळ आपत्ति आली. सर्वांत शेवटची आपत्ति ह्मणजे परवां सुरतेस घडलेला प्रसंग होय. ह्यासंबंधानें कांहीं लोक " पुढें काय " असा प्रश्न विचारतात. आमच्यामध्यें संशयी व निवृत्तिपर स्वभावाचीं कांहीं माणसें आहेत. तीं नेहमीं विचारतात कीं, " हें सर्व तुह्मी कशासाठीं करीत आहां ? इतके पुढें तुह्मी कसे चाललां ? असल्या गोष्टींस हात घालण्याचें सामर्थ्य आपल्यामध्यें आहे कोठें ? ज्या सामर्थ्याच्या जोरावर तुह्मीं हें चालविलें आहे तें सामर्थ्य कोठें आहे तें दाखवा. " त्याला मी बडोद्यास जें उत्तर सांगितलें तेंच येथें सांगतों. हिंदी लोक भोळ्या समजुतीचे असतात असें नेहमीं सांगण्यांत येतें. त्याप्रमाणें मी एक अतिशय भोळ्या समजुतीचा माणूस आहें. " **जें जें ह्मणून आह्मी हिंदी लोक हातीं धरूं तें तें खात्रीनें पार पाडूं** " अशी माझी एक भोळी समजूत आहे. आज पुष्कळ वर्षें ही माझी समजूत किंवा श्रद्धा कायम आहे. आमच्या **वन्दे मातरम्** पत्राचा तर हा मंत्र आहे. आह्मी जेव्हां बंगाल्यामध्यें या नव्या चळवळीस—या राष्ट्रीय चळवळीस—या स्वदेशी बहिष्काराच्या चळवळीस—प्रारंभ केला त्यावेळीं आह्मीं यशापयशाचा मुळींच विचार किंवा हिशोब केला नव्हता. या चळवळीचा स्वीकार एकदम आणि एकाएकीं करण्यांत आला. बंगाल्यामध्यें प्रथमतः कांग्रेसची चळवळ जोरांत होती. अर्ज पाठविल्यानें आपणांस पाहिजे तें मिळेल, असा सर्व बंगाली लोकांचा समज होता. पण यापासून उपयोग नाहीं; इतकेंच नव्हे तर उलटपक्षीं नुकसान आहे असें हळूहळू लोकांना वाटूं लागलें. लोकांचा पहिला समज नाहींसा

होत चालला ! आणि ते निराश झाले. स्वदेशी चळवळीस प्रारंभ होण्याच्या आधीं तीन चार वर्षें मी जेव्हां बंगाल्यांत गेलों तेव्हां लोकांच्या अंत:करणावर निराशेचा पगडा बसलेला असून ते अगदीं निरुत्साही झालेले मला आढळून आले. आह्मी इतकी राजकीय चळवळ करतों खरी, पण आमची नीट अवस्था नाहीं, आह्मी अधोगतीला चाललों आहोंत, अशी सामान्य लोकांची मनोवृत्ति होती. जुन्या कल्पनेवर—ज्या कल्पनेला यश येत नाहीं असें आढळून आलें त्या कल्पनेवर—विश्वास असलेले व तिला चिकटून बसलेले लोक होते, पण त्यांची संख्या अगदीं थोडी होती. लार्ड कर्झन ( यांनीं आपलें कल्याण केलें ह्मणून त्यांचा एक पुतळा उभारावा असें माझें मत आहे ) कांहीं विशिष्ट विचार मनांत धरून इकडे आले. त्यांनीं आपलें धोरण सुरू केलें व त्याचा रोंख विशेषतः बंगाल्यावर धरला. त्यांनीं बरेच कायदे पास केले. म्युनिसिपालिटीचा कायदा पसार केला; सर्व ठिकाणीं–विशेषतः बंगाल्यांत–निषेध प्रदर्शित करण्यांत आला असतांही त्यांनीं युनिव्हर्सिटीचा कायदा केला; आणि अखेरीस वंगभंगाचा शेवटचा घाव मारून त्यांनीं सर्व बंगाल्यांचीं अंतःकरणें विदीर्ण केलीं. बंगाली भाषा बोलणाऱ्या लोकांच्या ऐक्याचा विध्वंस करण्यांत आला. बंगालच्या फाळणीमुळें बंगाली लोकांच्या अंतःकरणास केवढा धक्का बसला याची कल्पना इतर प्रांतांतल्या लोकांस होणार नाहीं. बंगाली लोकांत वैशिष्ट्य हें आहे कीं, ते लोक कल्पनामय व विकारमय आहेत; आजपर्यंत आपण एका प्रांतामध्यें होतों व हें आपलें ऐक्य नाहींसें करण्यांत आलें, ह्या कल्पनेनें त्यांच्या मनास धक्का बसला. निराशेची व निरुत्साहाची प्रवृत्ति कायम ठेवणें यापुढें बंगाली लोकांना अशक्य झालें.मामुल वहिवाटीप्रमाणें त्यांनीं अर्ज पाठविले, सभा भरविल्या, निषेध प्रदर्शित केला, नम्रपणानें प्रार्थना केल्या, ठराव पास केले—सर्व कांहीं करून पाहिलें. प्रत्येक शहरांतून व प्रत्येक गांवांतून निषेधप्रदर्शक सभा झाल्या, पण काडीमात्र उपयोग झाला नाहीं. आतां कांहीं तरी केलें पाहिजे असें बंगाली लोकांना वाटूं लागलें, व स्वदेशी–बहिष्काराची चळवळ सुरू झाली. ही चळवळ सुरू केल्याचें श्रेय मागाहून पुढाऱ्यांनीं आपल्याकडे घेतलें खरें, पण वस्तुस्थिति तशी नाहीं. वंगभंग होण्यापूर्वीच स्वदेशी चळवळीस बंगाल्यांत थोडी थोडी सुरवात होऊन तिचें पाऊल पुढें पडत चाललें होतें. "आपण आतां बहिष्कारास

ही चळवळ कलकत्यास येऊन थडकली. त्याच वेळीं चिनी लोकांनीं अमेरिकन मालास बहिष्कार घातलेला असून तो बहिष्कार यशस्वीही झाला होता. तेव्हां ही बहिष्काराची कल्पना उत्कृष्ट आहे असें कलकत्यांतील लोकांच्या ध्यानांत आलें, व त्यांनीं ती तावडतोब उचलली. पण पुढाऱ्यांच्या मनांत शंका आली. ते ह्मणूं लागले, "हें कसें शक्य आहे बुवा ? हें करण्यास लोकांची दानत श्रेष्ठ पाहिजे." स्वदेशी चळवळीचा जन्म पुष्कळ वर्षांमागें दक्षिणेंत पुण्यास झाला व तेथून ही कल्पना कांहीं जणांनीं बंगल्यांतही नेली. पण त्यावेळीं बंगालनें तिचा अंगीकार केला नाहीं. ही चळवळ यशस्वी होण्याची आशा बाळगणें शुद्ध वेडेपणा आहे, निव्वळ मनोराज्य आहे, असें त्यावेळीं बंगाली लोक ह्मणाले. पुन्हां एकदा संमती–वयाच्या कायद्याचे वेळीं, सरकाराविरुद्ध आपणांजवळ असलेलें एक शस्त्र या दृष्टीनें हिचा पुकारा करण्यांत आला होता. या वेळची चळवळ सांप्रतच्या बहिष्काराच्याच अर्थाची होती. परंतु त्यावेळींही पुढाऱ्यांनीं तिच्यावर 'अशक्य' असा छाप मारला. ते म्हणत कीं, 'स्वदेशी चळवळीला यश मिळणें अशक्य आहे आणि बहिष्कार तर त्याहूनही अशक्य आहे. अर्थ-शास्त्राच्या दृष्टीनें बहिष्कार चुकीचा ठरतो. इतर देशांमध्यें जरी बहिष्काराला यश आलें तरी त्यांची व आपली परिस्थिति ह्यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. आपल्या लोकांत दानतीचा जोर नाहीं.' पुढारी लोकांचे विचार अशा प्रकारचे असण्याचें कारण लोकांच्या कर्तृत्वशक्तीवर त्यांचा विश्वास नाहीं हेंच होय. ही चळवळ निष्फळ होऊन तुह्मी मात्र हास्यास्पद व्हाल असें ते ह्मणत. पण या प्रसंगीं सुरू झालेल्या चळवळीच्या वेळीं लोकांमध्यें नवीन धमक आली. मागच्याप्रमाणें आतां त्यांनीं पुढाऱ्यांकडे लक्ष दिलें नाहीं. लोक म्हणाले, "यापुढें तुमच्या शंका कुशंका ऐकण्यास आह्मांस फुरसत नाहीं. आह्मी तुमचें ह्मणणें ऐकत नाहीं. ही चळवळ यशस्वी होवो अगर न होवो आह्मी ती करणार. आह्मांस यश मिळतें कीं नाहीं, हें आह्मी प्रत्यक्ष पहाणार.

यश येवो अगर न येवो, आमचें नशीब फुटलेलें आहेच; तर मग आम्हीं प्रयत्न करून तरी कां पाहूं नये ?" यावेळीं लोकमताचा प्रवाह इतका जोमदार होता कीं, पुढाऱ्यांना त्याविरुद्ध जाणें शक्य नव्हतें. अखेरीस बहिष्कारास त्यांनीं निरुपायानें आपली संमति दिली, व "सहा महिनेपर्यंत बहिष्काराची चळवळ करून वंगभंग रद्द होतो कीं काय तें आपण पाहूं" असें ते म्हणाले. इंग्रज अधिकाऱ्यांवर शह बसविण्यास याचा उपयोग किती होईल तें सहा महिने पहावयाचें, उपयोग झाल्यास बरेंच झालें, नाहीं तर पुढें बहिष्कार सोडून द्यायचा, असाच ठराविक विचार करून पुढाऱ्यांनीं ही बहिष्काराची तळी उचलली. परंतु बंगालमध्यें लोकांच्या विचाराला एक निराळी दिशा आधींपासूनच लागत चालली होती. हे विचार आतां उघडपणें पुढें येण्यास सुरवात झाली. आजपर्यंत आपण लेंच्यापेंच्या साधनांचा उपयोग करीत आलों; आह्मी पंगू आहों असा आपण एकसारखा ध्यास घेत आलों, पण हा पंगूपणा मूळचा नसून राजकीय परिस्थितीमुळें उत्पन्न झालेला आहे. आम्हीं स्वतःवरच जादूचा प्रयोग करून घेतल्यामुळें हा पंगूपणा आम्हांस खरोखरीचा वाटूं लागला. आतां ही कल्पना-ही जादू-झुगारून दिली पाहिजे. आपण आपल्या स्वतःच्या पराक्रमावर निष्ठा ठेवली पाहिजे. स्वामी विवेकानंद बारंवार या आत्मनिष्ठेसंबंधानें बोलत असत. आह्मी जें जें ह्मणून मनांत आणूं तें तें सिद्धीस नेऊं; अशा प्रकारच्या मतांचा फैलाव लोकांमध्यें अदृश्य रीतीनें झालेला होता. त्या विचारांना आतां दृश्य स्वरूप मिळालें व तें लोकांना तावडतोब पटलें. बहिष्काराची चळवळ करून त्यांत आपणांला यश येतें कीं नाहीं हें पहावयाचें असा या नवीन विचाराच्या लोकांनीं पक्का निश्चय केला. एक राजकीय युक्ति या नात्यानें बहिष्काराची चळवळ चालवूं नये, ती कांहीं मर्यादेपर्यंत चालवावयाची असा निर्बंध नसावा, तर ही चळवळ एकसारखी जारीनें चालूच ठेवावा, असें या लोकांचें ह्मणणें होतें. पुढाऱ्यांना बहिष्काराची चळवळ सहा महिन्यांपर्यंत-फाळणी रद्द होईपर्यंत-चालवावयास हवी होती, पण लोकांना ही मर्यादा नको होती. फाळणी रद्द होईपर्यंत बहिष्कार घालावयाचा अशी शपथ घेण्यास पुढाऱ्यांनीं सांगितलें. पण अशी मर्यादित शपथ घेण्याचें लोकांनीं साफ नाकारलें. लोकांना आपलें सामर्थ्य उमगलें होतें. आपण असमर्थ नसून समर्थ आहों ह्याची त्यांना ओळख

बंगभंग रद्द झाला नाहीं, तरी तिला चांगलेंच यश आलें आहे. बहिष्काराचा विचार लोकांच्या मनांत अगदीं वज्रलेप झाला. लोकांच्या पराक्रमावर निष्ठा ठेवल्यानें काय फळ प्राप्त होतें हें या पहिल्याच उदाहरणावरून सिद्ध झालें.

बंगाली लोक कांहींएक करूं शकणार नाहींत, त्यांच्यांत खरी कळकळ नाहीं, धैर्य नाहीं, स्वार्थत्याग तर मुळींच नाहीं, असें मी बंगाल्यांत आल्यापासून एकसारखा ऐकत होतों. बंगाली लोकांचा उत्साह क्षणिक असतो असा सर्वत्र समज होता. नवी चळवळ सुरू झाली तेव्हां पुढारी ह्मणत होते, " ही उठावणी नेहमींपेक्षां अधिक जोराची दिसते खरी, तरी ती लवकरच नाहींशी होईल. परदेशी कपडा सुबक असून स्वस्त मिळत असतां केवळ एका मनोविकाराच्या नादीं लागून आडामरडा व महाग मिळणारा स्वदेशी कपडा लोक घेतील तरी कसे ? व घेतला तरी किती दिवस घेतील ? " पण या त्यांच्या शंकांना आह्मी अगदीं कंटाळलेलों होतों. आमच्यामध्यें दोष असले, तरी ते आहेत आहेत असें रडगाणें गात न बसतां ते नाहींत अशीच मनाची समजूत करून त्यांना आह्मी नाहींसे करणार. आजपर्यंत लोकांनीं केलेल्या चळवळी यशस्वी कां झाल्या नाहींत ? तर लोकांचा स्वतःच्या कर्तबगारीवर विश्वास नव्हता आणि अज्ञांस शहाणपणा शिकविणाऱ्यांनींही हेंच शिकवून ठेवलें होतें ह्मणून. पण या चळवळीचा सर्वांनीं स्वीकार केला. लहान लहान पगारावर रखडणारे शाळामास्तर, लहान दुकानदार, कारकुनी पेशाचे लोक या सर्वांनीं बहिष्कारतत्वाचा अवलंब केला. बंगाली तरुणांना कोणतीही खरी कामगिरी करितां येणार नाहीं, आत्मयज्ञ करणें त्यांच्यानें होणार नाहीं, अशी पूर्वीं समजूत होती. परंतु बंगाली तरुणांनीं खरा स्वार्थत्याग करून दाखविला. विलायती माल विकत घेण्यास गेलेल्या गिऱ्हाइकांचीं त्यांनीं मनें वळविलीं, त्यांनीं आपल्या अभ्यासाचा वेळ खर्च केला, पोलीसची दंडुकेशाही सहन करण्यास ते तयार झाले, तुरुंगांत जाण्याची देखील त्यांनीं भीति बाळगिली नाहीं. नोकऱ्यांसाठीं धडपड न करितां,

लोकांच्या घरोघर विनफायद्यानें स्वदेशी कापड पुरविण्याचें त्यांनी मनावर घे-
तलें. ज्या मालाचा आपणांस खप वाढवावयाचा असेल त्या मालाची किंमत
कांहीं तरी कृत्रिम पद्धतीनें कमी करावी लागते असा अर्थशास्त्राचा नियम आहे.
या नियमाप्रमाणें फायदा न घेतां मूळ किंमतीला कापड विकण्याचें त्यांनी म-
नावर घेतलें, व अर्थातच तो कपडा गिऱ्हाईकांना स्वस्त पडूं लागला. असा
रीतीनें स्वदेशी कापडाची मागणी व पुरवठा वाढत गेला. प्रथम विलायती
कापड स्वदेशी कापडापेक्षां स्वस्त असे; तें पुढें सारख्या किंमतीचें झालें आणि
अखेरीस तर स्वदेशी कापडच स्वस्त मिळूं लागलें. याप्रमाणें स्वदेशी चळवळ
बंगाल्यांत यशस्वी झाली.

या स्वदेशी चळवळीपासून लवकरच राष्ट्रीय शिक्षणाचा उगम झाला.
स्वदेशी चळवळीस मदत करण्यास पुढें आलेल्या तरुणांचा गोरा अधिकारी-
वर्ग छळ करूं लागला तेव्हां राष्ट्रीय शाळा पाहिजेत असा पुकारा झाला.
सरकारी युनिव्हर्सिटयांमधून देण्यांत येणारें शिक्षण अपुरें आहे अशी ओरड
बंगाल्यांत पुष्कळ वर्षांपासून चालली होती. निरनिराळ्या विद्वानांनी यासंबंधा-
चे लेख लिहून ठेवले होते, पण खऱ्या राष्ट्रीय शिक्षणास कोणी आरंभ केला
नव्हता. " आह्मांस राष्ट्रीय शिक्षण द्या " असें विद्यार्थी पुढाऱ्यांना ह्मणूं ला-
गले. पुढारी ह्मणाले, हें एक नवीनच वेड उद्भवलें आहे ! राष्ट्रीय शिक्षण
अगदीं अशक्य असें पुढाऱ्यांनीं ठरविलें. खाजगी कालेजांचे मालक असलेले
पुढारी देखील असेंच ह्मणाले. आह्मी पाहिजे तर आपल्या शाळा तुमच्या ह-
वालीं करितों पण सरकारी युनिव्हर्सिटीची व त्यांची एकदां फारकत झाली
ह्मणजे सर्व विद्यार्थी आमच्या शाळा सोडतील असा मुद्दा त्यांनी पुढें आणला.
विद्यार्थी सरकारी शाळा सोडण्यास तयार झाले; पण त्यांना उत्तेजन मिळालें
नाहीं. पण सर्वच लोक कांहीं नन्नाचा पाढा वाचणारे नव्हते. कांहीं जणांनीं
विद्यार्थ्यांच्या ह्मणण्यास रुकार दिला व हें काम हातीं घेतलें. प्रथमतः रंगपूरचे
विद्यार्थी सरकारी शाळेंतून निघाले आणि राष्ट्रीय शाळा पाहिजे अशी त्यांनी
मागणी केली. परत शाळेंत जाण्यास जो दंड द्यावा लागतो तो देण्यास किंवा
जी माफी मागावी लागते ती मागण्यास आह्मी तयार नाहीं, आमच्या शि-
क्षणाची तजवीज तुह्मी करा, असें त्यांनी सांगितलें. अशा प्रकारें रंगपूर येथें

ते घ्या. ममनसिंगचे दुसरे एक जमीनदार पुढें आले. ते ह्मणाले, मी श्रीमान् जमीनदार आहें, मी दहा लक्ष रुपये सांठवले आहेत त्यांतले पांच लक्ष घ्या. याप्रमाणें मदत मिळाल्यावर राष्ट्रीय शिक्षण देणारें कालेज काढण्यास पुढाऱ्यांना आपली संमति द्यावी लागली. निदान लोकांपुढें उघड रीतीनें तरी याविरुद्ध त्यांना बोलतां येईना; बंगाली लोकांमध्यें शारीरिक व नैतिक धैर्य नाहीं असा पुष्कळ वर्षांचा आक्षेप होता. जें वाङ्मयात्मक शिक्षण आह्मांस मिळे त्यांतही हेच विचार असत. खुद्द बंगाली लोकांचाही असा समज झाला होता कीं, आपण भ्याड, आपले पूर्वज भ्याड आणि आपले वंशजही भ्याडच निपजणार. पण नवीन विचारांच्या लोकांना अशी खात्री उत्पन्न झाली कीं, आपण भ्याडांचें राष्ट्र वीरांचें राष्ट्र करून सोडूं. तरुण, मध्यम वयाचे व वृद्ध असे लोक नव्या चळवळींत सामील झाले. या चळवळीपूर्वी ते भ्याड होते. पुढें त्यांनीं जें कांहीं करून दाखविलें तें करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आहे असें जर एखादा त्या वेळेस ह्मणता तर लोकांनीं त्याला वेडा ठरविला असता. पण अशक्य वाटणारी ही गोष्ट शक्य झाली, व बंगाली तरुणांचें धैर्य किती आहे हें सर्वांच्या निदर्शनास आलें. ज्या युगांतर पत्रावर आतां तिसरा खटला चालला आहे त्या युगांतर पत्राचे हपीसांतील एक तरुण इसम पहिला खटला होण्यापूर्वी मला भेटला होता; तो ह्मणत होता कीं, "हे लोक मला कडक लिहूं देत नाहींत; आणि तुरुंगांत जाण्याची संधि मला मिळत नाहीं." अशा तऱ्हेचें धाडस बंगाली तरुणांमध्यें आतां आलेलें आहे. आपलें राष्ट्र समर्थ आहे अशी लोकांची ठाम कल्पना होणें हेंच या यशाचें बीज आहे. ह्या जोमदार कल्पनेचा उपदेश स्वामी विवेकानंद यांनीं आह्मांला केला. स्वामी विवेकानंदांचे गुरु भगवान् रामकृष्ण परमहंस नेहमीं ह्मणत कीं, स्वतःच्या पापाविषयीं आणि स्वतःच्या निर्बलतेविषयीं एकसारखें रडगाणें गाणारे लोक मला आवडत नाहींत. बायबलामध्यें असली पापाची व निर्बलतेची कल्पना आहे. हीच कल्पना ब्रह्मसमाजानें बायबलापासून घेतली आहे. 'आह्मी पापी'

'आह्मी पापी' असा ध्यास घ्याल तर खरोखरच पापी व्हाल. 'आह्मी पवित्र आहों' 'आह्मी ब्रह्म आहों' असेंच नेहमीं ह्मणत जा; ह्मणजे तुम्ही तसेंच व्हाल. सिंहाचा छावा मेंढरांमध्यें राहूं लागल्यामुळें मेंढरासारखा कसा झाला याची गोष्ट आपल्याला ठाऊक आहेच. पुढें जेव्हां खऱ्या सिंहानें त्यास ओळख करून दिली तेव्हां त्याचा स्वाभिमान जागृत झाला. स्वामी विवेकानंद ह्मणत असत, तुह्मी जसे चिंतीत आलां तसेच झालां. 'आह्मी ब्रह्म आहों, पराक्रम करण्याचें सामर्थ्य आमच्यांत आहे, आह्मी कोणत्याही राष्ट्रांतील लोकांच्या बरोबरीनें शहाणे व बलिष्ठ आहों असें रात्रंदिवस मनांत वागवाल तर खरोखरच तुह्मी सर्वांत शहाणे, थोर आणि स्वतंत्र व्हाल.' हा मंत्र–ही दिव्य कल्पना–आह्मीं लोकांना शिकविली. कोणत्याही गोष्टींची भीति बाळगूं नका. आपल्या अंतिम हेतूकडे एकसारखी दृष्टि लावा, 'माझ्या देशाला ही गोष्ट पाहिजे आहे काय' एवढेंच काय तें पाहून तसें असल्यास 'मी हें करणार, तें सिद्ध झालेंच पाहिजे व मला कोणीही विघ्न आणूं शकणार नाहीं अशा आत्मनिष्ठेनें एकदम कार्यास लागा.' राष्ट्रीयत्व ह्मणजे काय, तर आपल्या राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीवर दृढ विश्वास असणें हेंच होय. स्वतःच्या व स्वदेशबांधवांच्या कर्तबगारीचा अमर्याद भरंवसा असणें हेंच राष्ट्रीयत्वाचें लक्षण होय. एक नेमस्त गृहस्थ मला आज सकाळीं भेटला होता. त्यानें मला राष्ट्रीय पक्ष व नेमस्त पक्ष यांमध्यें काय फरक आहे ह्मणून विचारलें. तेव्हां मीं त्याला सांगितलें कीं, राष्ट्रीय पक्षाच्या माणसाचा राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीवर दृढ विश्वास असतो, आणि नेमस्ताचा नेमस्त विश्वास असतो किंवा मुळींच नसतो. हें उत्तर अर्थातच त्याला रुचलें नाहीं व तो 'आमचाही राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीवर विश्वास आहे' असें ह्मणूं लागला. तेव्हां मीं त्याला पुन्हां हेंच सांगितलें कीं, तुमचा राष्ट्राच्या कर्तबगारीवर असावा तसा भरंवसा नाहीं, म्हणूनच तुम्ही अजून नेमस्त आहांत; नाहींतर तसे नसतां. तुमच्यापुढें अंधःकार दिसत असतां त्यांत उडी घालण्याची तुमची तयारी असली पाहिजे. दर महिन्यास दर वर्षास तुह्मांवर संकटें येतील. पण त्यांस न जुमानतां उद्दिष्ट हेतूकरितां झगडण्यास तुम्हीं सज्ज झालें पाहिजे. नुसत्या शक्याशक्यतेचा व युक्तायुक्ततेचा विचार करीत बसाल तर तुम्ही निरंतर विचारच करीत रहाल. विद्यार्थ्यांची राष्ट्रीय शिक्षणाची सोय करावयाची असें ठरवून आह्मीं

या कार्यास तावडतोब आरंभ केला व त्यांत यशस्वी झालों. आतां बंगाल्यांतील बहुतेक सर्व जिल्ह्यांत एकेक तरी राष्ट्रीय शाळा आहे. असल्या कामाला प्रथमतः पैसा मिळत नाहीं. पण जीं थोडींशीं माणसें मिळतात त्यांनीं एकत्र होऊन खट-पट केली म्हणजे वर्गणी जमते. 'करूं कीं नको करूं' अशा प्रकारची संशयी वृत्ति बंगाल्याच्या बाहेरप्रांतीं फार दिसते. यावरून त्यांच्यांत आत्म-निष्ठेची उणीव आहे, कारण त्यांना अजून खरा मार्ग दिसला नाहीं. स्वतः सुर-क्षित रहावें अशी कल्पना हिंदुस्थानांत दृढमूल झालेली आहे. ही कल्पना बाजूला ठेवा आणि देशाला ज्या गोष्टीची अपेक्षा आहे. ती करण्यास पुढें व्हा. वास्तविक पाहिलें तर बंगाल्यापेक्षां इतर प्रांत कांहीं बाबतींत श्रेष्ठ आहेत. तेव्हां जें बंगाली लो-कांनीं केलें तें या प्रांतांतल्या लोकांना सहज करतां आलें पाहिजे. भरंवसा—स्वतः-च्या कर्तबगारीवर दृढ भरंवसा—अत्यंत आवश्यक आहे. हेंच आपणांस सांगावें असें वाटल्यावरून मीं सांगितलें आहे. आमची चळवळ चिरडून टाकण्याकरितां कसेही प्रयत्न करण्यांत आले तरी आम्ही बंगाली लोक आतां भीत नाहीं. जुलूम किंवा दपटशाही सहन करण्याची शक्ति आमच्यांत आली आहे. आम्ही यशस्वी होणार असा आमचा भरंवसा असतो, आणि यशस्वी होण्याच्या प्रयत्नांत आ-मचा सत्यनाश झाला तरी आम्ही फिकीर बाळगीत नाहीं. आमचा मार्ग परमे-श्वरानें दाखविलेला आहे आणि आमच्या प्राप्तव्याकडे आम्ही वेगानें चाललों आहों. आम्ही कशालाही भिणार नाहीं, संकटांना तर आम्ही पाचारण करतों, कारण त्यांमुळेंच आम्हांस अधिक बळ येतें; याच मार्गानें तुम्ही चला असा आम्हां बंगाली लोकांचा इतर प्रांतांतील लोकांना निरोप आहे. हिंदी लोक एक-जुटीनें, एक निश्चयानें आणि एक विचारानें चालूं लागले म्हणजे त्यांना थांब-विण्याचें सामर्थ्य कशांतही उरणार नाहीं आणि हिंदुस्थान भरभराटीस येऊन श्रेष्ठ व स्वतंत्र होईल.

वंदे मातरंच्या प्रचंड जयघोषांत अरविंद बाबूंचें व्याख्यान संपलें. व्याख्यान चालू असतांना कोणी हूं का चूं केलें नाहीं. त्यांच्या मुखांतून निघणारा प्र-त्येक शब्द आपल्या कानीं पडावा अशी इच्छा प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होती. पुण्यास व्याख्यान चालू असतां इतकी शांतता क्वचितच आढळते. असो, नंतर रा. टिळक व्याख्यात्यांचे आभार मानावयास उभे राहिले. ते म्हणाले,

पोक्त विचार करीत बसल्यानें भागत नाहीं; तर प्रत्यक्ष पाण्यांतच उडी टा-
कली पाहिजे. योग्य संधि येण्याची वाट पाहून ती येणार नाही, तर आपल्या
कर्तबगारीनें ती उत्पन्न करण्यास तयार झालें पाहिजे. सरकारची दपटशाही
आपणास पुढें जाऊं देत नाहीं; आणि नेमस्त शृंखळा आपणास मागें खें-
चीत आहेत. या दोघांशीं टक्कर देऊन आपणास पुढें जावयाचें आहे. आमच्या
देशाच्या भावी उन्नतीचा काळ खास येणार अशी आमची निष्ठा आहे. अ-
रविंद बाबूंच्या व्याख्यानाचा सारांश हाच आहे. पुन्हां येथें येण्याबद्दल मी
आपल्या तर्फे त्यांना आमंत्रण देतों. अशा आशयाचें भाषण करून रा. टि-
ळकांनीं व्याख्यात्यांचे आभार मानले. नंतर अरविंद बाबूंच्या गळ्यांत, अ-
ध्यक्षांनीं टाळ्यांच्या गजरांत हार घातल्यावर सभा बरखास्त झाली.

---

## व्याख्यान दुसरें.

# राष्ट्रीय शिक्षण.

[ बुधवार ता. १५ जानेवारी १९०८ रोजीं मुंबईस झालेलें व्याख्यान. ]

राष्ट्रीय शिक्षण हा विषय फार विस्तृत आहे. त्याचा इतका विस्तृतपणा पहिल्यानें विषय सांगितला तेव्हां माझ्या लक्षांत आला नाहीं; परंतु त्यावर विचार करूं लागलों तेव्हां तो लक्षांत आला. राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें बोलतांना येथें ज्या अडचणी आहेत त्या बंगाल्यांत नाहींत. कारण ‘ राष्ट्रीय शिक्षण ’ ह्मणजे आवीं काय, हीच गोष्ट ह्या मुंबई इलाख्यांत पुष्कळांस स्पष्ट रीतीनें कळलेली नाही. ‘ राष्ट्रीय शिक्षण ’ ह्यांत कांहीं विशिष्ट अर्थ आहे किंवा नाहीं, ह्याबद्दलच ह्या बाजूच्या कांहीं विद्वान मंडळीच्या मनांत संशय आहे. राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे काय हें सांगण्याची बंगाल्यांत कांहीं जरूरी नाहीं. राष्ट्रीय





शिक्षणाच्या कोणी विरुद्ध असोत किंवा बाजूचे असोत, परंतु राष्ट्रीय शिक्षण ही प्रत्यक्ष घडलेली व लोकांनीं अनुभव घेतलेली गोष्ट बंगाल्यांत आहे. तें काय आहे ह्याबद्दल आतां कोणाची खात्री करून देण्याचें बंगाल्यांत तरी प्रयोजन नाहीं. तुमच्या मुंबई इलाख्यांत राष्ट्रीय शिक्षण हें अजून शाब्दिक आहे व तें शब्दांच्या पलीकडे गेलें नसल्याकारणानें त्याबद्दल येथील लोकांच्या मनांत संशय आहे. राष्ट्रीय शिक्षण, राष्ट्रीय शिक्षण ह्मणतां तें आहे तरी काय, हेंच मला आधीं समजत नाहीं, असें येथील एका गृहस्थानें त्यासंबंधानें ह्मटलें आहे ! दुसरे ह्मणतात कीं, गणितशास्त्राचा विचार करावयाचा ह्मणजे त्यासंबंधानें राष्ट्रीय शिक्षणाचा अर्थ कसा, हेंच समजत नाहीं ! ना. गोखले ह्यांनीं राष्ट्रीय शिक्षणाचा आपणांस अर्थ समजत नाहीं असें ह्मटलेलें नाहीं, तरी त्यांस तो समजला नाहीं हें त्यांनीं दाखविलें आहे कलकत्ता येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेंत सर्वानुमतें पास झालेला राष्ट्रीय शिक्षणाचा ठराव सुरतच्या राष्ट्रीय सभेंत आला नाहीं, कारण दुर्दैवानें ती भरली नाहीं. परंतु कलकत्यास पास झालेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या ठरावांत ना० गोखले ह्यांनीं कांहीं फेरफार केलेला आहे व तो फेरफार मुळींच महत्वाचा नाहीं असें त्यांचें ह्मणणें आहे. माझें मत ह्या बाबतींत त्यांच्या मताच्या विरुद्ध आहे. राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें बंगाल्यांत असलेली वस्तुस्थिति ना. गोखले यांस माहीत नसावी. कलकत्ता येथें पास झालेल्या ठरावांत ' राष्ट्रीय ' हा शब्द तीनदां घातलेला आहे व तो हेतुपुरस्सर घातलेला आहे. ना. गोखले यांनीं केलेल्या फेरबदलांत ' शिक्षणाची स्वतंत्र व्यवस्था ' [An independent system of education] असे शब्द घातले आहेत. ह्या शब्दांचे अर्थ पुष्कळ होतील, परंतु आमचा अर्थ ह्यांत कांहीं येत नाहीं कलकत्ता येथील सब्जेक्ट कमेटीनें ' राष्ट्रीय ' ( National ) हा शब्द ठरावांत तीनदां घातलेला आहे तो कांहीं उगाच नव्हे. राष्ट्रीय शिक्षण राष्ट्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय देखरेखीखालींच द्यावयाचें असा कलकत्ता येथें पास झालेला ठराव आहे व त्यांतील एकही शब्द गाळतां येत नाहीं. ( National Education must be on National lines and und r National control ) ह्यासंबंधानें असा एक प्रश्न विचारण्यांत येतो कीं, आह्मी ' राष्ट्रीय ' हें नांव शिक्षणास कां देतों ? ह्या मंडळीचें ह्मणणें असें आहे कीं, आधीं आमचें राष्ट्रच नाहीं. आह्मांस राष्ट्र ही कल्प-

नेतील गोष्ट आहे, प्रत्यक्ष नव्हे. हिंदुस्थान देशांत हजारों जाती आहेत, शेंकडों धर्मपंथ आहेत, नानातऱ्हेचीं मतमतांतरें आहेत. तेव्हां ' राष्ट्रीय ' ह्या शब्दाचा उपयोग हिंदुस्थानासंबंधानें करणें ह्मणजे त्यांत कांहीं अर्थच नाहीं. ह्या विचारांच्या लोकांस आधीं राष्ट्र ह्मणजे काय हेंच समजत नाहीं. त्यांचें ह्मणणें काय कीं, निरनिराळ्या जाति व धर्मपंथ नाहींसे कराल तेव्हांच राष्ट्र बनेल. देशांतील सर्व लोक एका धर्माचे व एका जातीचे होतील तेव्हांच राष्ट्र बनेल, हें ह्मणणें खोटें आहे. धर्म, जाति, हीं राष्ट्रीयत्वाला लागणारीं कायमचीं अंगें नव्हत. भूगोलावरून पाहिलें तर हिंदुस्थान हा एक मोठा देश आहे असें ह्मणतां येईल, परंतु त्याला ' राष्ट्र ' ही संज्ञा देतां येणार नाहीं, असें कांहींचें ह्मणणें आहे. परंतु आमचें ह्मणणें असें आहे कीं, भूगोलावरून पाहिलें तरी हिंदुस्थान देश मूळचाच दुसऱ्यांपासून अलग आहे, ही गोष्ट त्याच्या राष्ट्रीयत्वाचें एक अंग आहे. हिंदुस्थानसारखाच मूळचा अलग असा इटली देश तीस वर्षांत स्वतंत्र राष्ट्र बनला. हिंदुस्थानाची अंतर्बाह्य रचना, लोकांची रहाणी, धर्म, वगैरे सर्वच इतर जगापासून भिन्न आहेत व तीं फार प्राचीन काळापासून आहेत. आक्षेपकांचें ह्मणणें असें आहे कीं, हिंदुस्थान हा कधीं राष्ट्रच नव्हता. तेव्हां राष्ट्र ह्मणजे काय याचा आधीं विचार करूं. राष्ट्रीय पद्धतीनें शिक्षण द्या, असें जेव्हां आह्मी ह्मणतों तेव्हां मागील सर्व झुगारून देऊन अगदीं नवीन पद्धतीनें शिक्षण द्या, असें आह्मी ह्मणत नाहीं. आमच्या देशाचा मागील इतिहास पाहिला तर स्वतंत्र असें राष्ट्रीय शिक्षण आमच्याकडे होतें, असें आढळून येईल. आमच्या तत्वज्ञानाकडे पाहिलें तरी पिंड व ब्रह्मांड व जें पिंडीं तें ब्रह्मांडीं असें सांगितलेलें दिसेल. अर्थात राष्ट्र ही सचेतन, जिवंत अशी वस्तु आहे; तुम्ही बनवून झालेली राष्ट्र ही कांहीं वस्तु नव्हे. तिची वाढ ही झालीच पाहिजे; व ती उन्नतावस्थेप्रत पोंचलीही पाहिजे. मग ती हजार वर्षांत पोंचो वा वीस वर्षांत पोंचो. माणसाचे जसे स्थूल, सूक्ष्म व कारण असे तीन देह आहेत, तसेच ते राष्ट्राचेही आहेत. आमच्या तत्वज्ञानाप्रमाणें चर्मचक्षूंनीं दिसणाऱ्या नुसत्या स्थूल देहाचें वर्णन केल्यानें माणूस समग्र जाणला जात नाहीं. तर त्याच्या तिन्ही देहांचा विचार करावा लागतो, व तेव्हांच माणसासंबंधानें पुरें ज्ञान होतें. जशी माणसाची तशीच राष्ट्राची गोष्ट होय. आपल्या राष्ट्राचा विचार करावयाचा ह्मणजे प्रथम आपल्या मातृभूमीचा विचार

करावयाचा. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत ज्याचा विस्तार, पूर्व पश्चिम समुद्रांनीं ठरविलेली ज्याची सीमा, ज्यांत गंगा, यमुना, नर्मदा, कृष्णा, गोदावरी, वगैरे नद्या वहात आहेत, प्राचीन शहरें आहेत, उंच उंच घुमटांचीं देवालयें आहेत, रमणीय वाडे आहेत, असा पृथ्वीचा भाग ज्याला आज हिंदुस्थान ह्मणताता तो, आमचें राष्ट्र ह्मटल्याबरोबर आह्मांपुढें उभा रहातो. व हेंच आमच्या राष्ट्राचें स्थूल शरीर होय. बाबू बंकिमचंद्र ह्यांनीं रचलेलें 'वंदे मातरम्' हें आमच्या राष्ट्राच्या स्थूल शरीराचें वर्णन होय. हिंदुस्थानांत वास करीत असलेल्या तेहतीस कोटी लोकांचीं सुखदु:खें, त्यांच्या बऱ्या वाईट वासना, वगैरेंचा समावेश राष्ट्राच्या सूक्ष्म शरीरांत होतो. वर नमूद केलेल्या शरीरांत कालमानानें नाना तऱ्हेचे फेरबदल झाले तरी बीजरूपानें अविनाशी असा कायमचा अणु असतो व तो सर्वांचें आदिकरण असल्यानें त्यांतूनच भावी गोष्टी घडून येतात; व त्याप्रमाणें भावी राष्ट्र बनतें. हें राष्ट्राचें कारण शरीर होय. परंतु इतक्यानेंच भागत नाहीं. माणसाची कल्पना करतांना आमच्या शास्त्रांत नुसत्या वर्तमानाचाच नव्हे तर भूत व भविष्याचाही विचार करण्यांत येतो. हीच गोष्ट राष्ट्रालाही लागू पडते. आपण नद्या, पर्वत, शहरें, वगैरेंचा उच्चार करितों तेव्हां वर्तमानकाळापुरताच देशाचा विचार करतों काय ? नव्हे. तर पांच हजार वर्षांचा इतिहास बोलत असतों. दिल्ली व आग्रा ह्या शहरांचा उच्चार करतों तेव्हां अकबर बादशहाचें दिल्ली शहर आपणांपुढें उभें रहात नाहीं काय ? तेव्हां आज राष्ट्राचा विचार करतांना मागील माणसांबद्दलचा विचार आपणापुढें आला पाहिजे. अशा दृष्टीनें पाहिलें ह्मणजे शिवाजी, अशोक व अकबर हेही आजच्या हिंदी राष्ट्राचे घटकावयव आहेत, हें समजेल. त्याचप्रमाणें प्राचीन ऋषीही होत. जपानकडे पाहिलें तर आपणांस असें आढळून येईल कीं, जपानी लोकांचें लक्ष त्यांच्या पूर्वजांकडे फार असतें. आपल्या शत्रूशीं निकराची लढाई करणाऱ्या जपानी वीराला जपान देशासाठीं ज्यांनीं आपल्या प्राणांच्या आहुती दिल्या अशा त्यांच्या पूर्वजांची पुरी माहिती असे. पूर्वजांचा सन्मान कसा करावयाचा व त्यांची आठवण करून राष्ट्रीयत्वाची जागृति कशी करावयाची हें जपानापासून शिका. जें जें ह्मणून तुह्मी आज करतां तें तुमच्यासाठीं नसून पितरांच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं करतां हें लक्षांत बाळगा. तुमचे पूर्वजच नव्हेत तर तुमची भावी प्रजाही तुमच्या

राष्ट्राची घटकावयव होय. हिंदी राष्ट्राचा विचार करावयाचा तो अशा दृष्टीनें केला पाहिजे. पाश्चिमात्य सुधारणेला केवळ भुरळून जाण्यांत अर्थ नाहीं. अशा व्यापक व उदार दृष्टीनें आपण आपल्या राष्ट्राचा व राष्ट्रीयत्वाचा विचार केला व कामाला लागलों ह्मणजे त्याच्या योगानें मोठेमोठे तत्ववेत्ते, थोर मुत्सद्दी, बडे लढवय्ये, सेना नायक—आज मी ह्मणत नाहीं,—आपल्या राष्ट्रांत उत्पन्न होतील. राष्ट्र हा शब्द अर्थपूर्ण आहे, राजकीय सोयीचा हा शब्द नव्हे. बंगाल्यांत राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें विचार करतांना आम्हीं राष्ट्रसंबंधाची ही उदार कल्पना पुढें ठेवलेली आहे. ह्या उदार कल्पनेला धरून आह्मीं राष्ट्रीय शिक्षणाचा उपक्रम कसा केला आहे तें पाहूं. आपण सर्वांत सोपा असा भूगोल विषयच घेऊं. आजच्या शिक्षणपद्धतीप्रमाणें सरकारी व खाजगी शाळांतून भूगोल हा विषय कसा शिकविला जातो तो पहा. अमका अमका देश, त्याचे निरनिराळे परगणे, त्या परगण्यांतील डिस्ट्रिक्ट ऑफिसर, वगैरेंची माहिती भूगोलांत शिकवितात; पण तिचा उपयोग काय? बंगाल्यांत आह्मी राष्ट्रीय पद्धतीनें शिक्षण देतों त्यांत भूगोल शिकवितों तो निराळ्या तऱ्हेनें शिकवितों. भूगोल शिकवितांना पहिली गोष्ट आह्मी मुलांना सांगतों ती ही कीं, हिंदुस्थान ही आपली मातृभूमि होय. अशा रीतीनें आपल्या राष्ट्राचें स्थूल शरीर काय तें आह्मी मुलांस प्रथम सांगतों. गंगा, यमुना, नर्मदा, वगैरे **काय आहेत** तें भूगोल शिकवितांना आह्मी सांगतों, **कोठें आहेत** तें सांगत नाहीं. महाराष्ट्राचें वर्णन करीत असतां बंगाल्यांतील राष्ट्रीय शाळांतून आह्मी शिवाजीमहाराजांचा अवतार ज्या महाराष्ट्रांत झाला तो महाराष्ट्र काय हें शिकवितों. पंजाबासंबंधानें बोलतांना रणजितसिंगाचा पंजाब आह्मी मुलांना सांगतों. हिमालयाची माहिती सांगतांना ऋषींच्या वास्तव्यानें पवित्र झालेल्या हिमालयाचा भूगोल आह्मी राष्ट्रीय शाळांतील विद्यार्थ्यांस शिकवितों. दुसऱ्या देशाचाही भूगोल आह्मी शिकवितों; परंतु स्वदेशाशीं त्या देशाचा संबंध काय आहे, इतकीच माहिती आह्मी विद्यार्थ्यांस सांगतों. भूगोलाप्रमाणें इतिहास हा विषयही बंगाल्यांत आह्मी राष्ट्रीय पद्धतीनें शिकवितों. किती राजांनीं राज्य केलें, ते गादीवर आले कधीं, गेले कधीं, प्लासीची लढाई कोणत्या तारखेला झाली, वगैरे गोष्टींकडे इतिहास शिकवितांना, आम्ही विशेष लक्ष देत नाहीं. प्राचीनकाळीं हें आमचें आर्य राष्ट्र कसें

बनलें, मराठे हे आजचे मराठे केव्हां झाले, तसेंच बंगाली व पंजाबी कसे झाले, हें आम्ही इतिहास शिकवितांना सांगतों. विद्यार्थ्यांना ह्या सर्व गोष्टी नीट समजल्या म्हणजे प्लासीची लढाई कोणत्या वर्षी झाली हें सांगतां आलें नाहीं तरी चालेल. सारांश, आमच्या इतिहासाचा खरा भाग शिकविण्यास हल्लींच्या सरकारी शिक्षणपद्धतीनें अजून सुरवातही झाली नाहीं म्हटलें तरी चालेल. भूगोल व इतिहास ह्यांच्याप्रमाणेंच बंगाल्यांतील राष्ट्रीय शाळांतून तत्वज्ञानाचा विषयही आम्ही राष्ट्रीय पद्धतीनेंच शिकवितों. सर्व जगांतील तत्वज्ञानापेक्षां आमचें तत्वज्ञान श्रेष्ठ आहे, हें आम्ही नॅशनल कॉलेजांतील विद्यार्थ्यांस समजावून सांगतों. सरकारी पद्धतीनें शिकलेले पदवीधर तत्वज्ञानासंबंधानें बोलतांना शोपेनहोर काय ह्मणतो तें सांगतात, परंतु स्वतःचें शास्त्र कांहीं त्यांस माहीत नसतें. तात्पर्य, कॉलेजांतून व नंतर जें जें तत्वज्ञान विद्यार्थी शिकतील तें तें आपल्या आचरणांत आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला पाहिजे.

राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे एखादी अगदीं नवीन गोष्ट आह्मी सुरू करतों असें नाहीं. त्याची सुरवात आमच्या पूर्वजांनींच करून ठेवली आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या योगानें शिवाजी महाराजांची थोरवी कायम राहील. अशोकाचा मोठेपणा व अकबराची कीर्ति दिगंतरीं दुमदुमत राहील. प्राचीन ऋषींचें वैभव सर्व जगाच्या निदर्शनास येईल. जी जी ह्मणून उपयोगाची व महत्त्वाची गोष्ट आहे तिचा अव्हेर राष्ट्रीय शिक्षणांत आह्मी करीत नाहीं. अशा रीतीचें राष्ट्रीय शिक्षण सरकारी शाळांतून मिळत नाहीं. सरकारी शाळांतून पुष्कळ युरोपियन विचारांचें ओझें आमच्या विद्यार्थ्यांच्या कोंवळ्या मनावर लादलें जातें. युरोपियन आचारविचार व एकंदर युरोपियन रहाणी आमच्या आचारविचारांहून अगदीं भिन्न आहेत. आतां इतकें खरें कीं, प्राचीन व अर्वाचीन सुधारणेचा विचार करीत असतां हल्लींच्या युरोपियन सुधारणेचा विचार आपणांस अजीबात बाजूला ठेवतां यावयाचा नाहीं. आमची सुधारणा आह्मी करीत असतां पाश्चिमात्य सुधारणेंतील ग्राह्य तितक्या गोष्टी आपणास घेतल्याच पाहिजेत. परंतु त्यामुळें आपल्या मूळांना धक्का बसणार नाहीं इतकी खबरदारी घेतली ह्मणजे बस्स झालें. जपानाप्रमाणें पाश्चिमात्य सायन्सचा आपण उपयोग करून घेणें जरूर आहे, परंतु तें काम करीत असतां आपल्या पूर्वजांचे कृतीकडे अजीबात डोळेझांक

करणें बरोबर होणार नाहीं. उदाहरणार्थ, सरकारी पद्धतीप्रमाणें मेडिकल कॉलेजांतून शिकणाऱ्या व शिकलेल्या विद्यार्थ्यांनीं आमची आयुर्वेदिक पद्धत विसरतां कामा नये. आयुर्वेदिक पद्धतींत पुष्कळ गूढ परंतु उपयोगी गोष्टी आहेत, त्या पाश्चिमात्य पद्धतींत नाहींत. तरी पण आमचें तेवढें सर्वच चांगलें असें आपणांस ह्मणतां यावयाचें नाहीं. राजकीय गोष्टींसंबंधानें विचार करावयाचा ह्मणजे आह्मांस पाश्चिमात्यांपासून बरेंच शिकावें लागेल. लोकनियंत्रित राज्यसत्तेची पद्धत आह्मांस युरोपियन लोकांपासून शिकली पाहिजे. राष्ट्रीय शिक्षण देत असतां राजकीय गोष्टींपासून आह्मी विद्यार्थ्यांस अलिप्त ठेवीत नाहीं, इतकेंच नव्हे तर प्रजासत्ताक राज्यपद्धति काय आहे हें आह्मी त्यांस अनुभवानें आमच्या बरोबर कामाला घेऊन शिकवितों. उद्योगधंद्याकडे व नुसत्या व्यापाराकडेच विद्यार्थ्यांनीं लक्ष घालावें असें आह्मीं त्यांस सांगत नाहीं. नुसत्या व्यापारानेंच राष्ट्र उदयास येईल हें ह्मणणें खोटें आहे. इतिहास पाहिला तर असा नाहीं. नुसत्या व्यापारावर वाढलेलीं राष्ट्रें फार दिवस तगलीं नाहींत. देशांतील उद्योगधंदा व व्यापार ह्यांची मांडणी कोणत्या धोरणानें करावयाची याकडे युरोपांत विशेष लक्ष देत असतात. आमच्या राष्ट्रीय पद्धतीनें शिक्षण देतांना आह्मी विद्यार्थ्यांस वस्तुस्थितीचें ज्ञान करून देतों. ह्मणून आमच्या शाळेंतील विद्यार्थी शास्त्र काय आहे तें शिकतो, शास्त्रविषयीं शिकत नाहीं. सुतार, लोहार, वगैरेंचीं हातचीं कामें करण्यासही आह्मी शिकवितों; व त्यामुळें आमच्या कॉलेजांतून अगर शाळेंतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांस दरमहा पंचवीस तीस रुपये मिळण्यास आज हरकत पडत नाहीं. सरकारी पद्धतीनें शिकलेल्या विद्यार्थ्यांस दरमहा पंधरा रुपयेही मिळण्याची पंचाईत पडते. राष्ट्रीय पद्धतीनें राष्ट्रीय शिक्षण देतांना आमचें लक्ष भावी हिंदी राष्ट्र बनत आहे ह्याकडे विशेष असतें. राष्ट्रीय शिक्षणाचा विचार करीत असतांना निरनिराळ्या शिक्षणपद्धतींच्या सर्व बाजूंचा विचार करावा लागतो. प्रि० परांजपे ह्मणतात त्याप्रमाणें नुसत्या गणिताची गोष्ट घेऊन चालणार नाहीं. हें हिंदी राष्ट्र इतर राष्ट्रांच्या बरोबरीचें मोठें केव्हां होईल हा विचार राष्ट्रीय शिक्षण देण्यांत असतो. आमचीं मोठीं माणसें इतर देशांतील मोठ्या माणसांच्या तोडीचीं कशीं होतील हा विचार आमचा सतत असतो. आमच्या शाळांतून पांचव्या इयत्तेपर्यंत आह्मी मुलांस

व्हर्सिटीच्या इंटरमिजीएटच्या बरोबरीची आहे. आमच्या कॉलेजांतील अभ्यासक्रम चार वर्षांचा आहे. कॉलेजांत विद्यार्थ्यांस एकाच विषयाचें अध्ययन करावयाचें असून तेथें इंग्रजी भाषेचा उपयोग विशेष केला जातो. तरी पण राष्ट्रीय पद्धतीच्या आमच्या शिक्षणक्रमांत इंग्रजीला अग्रस्थान दिलेलें नसून ती दुसरी भाषा ह्मणून विद्यार्थ्यांस शिकविण्यांत येते. विद्यार्थ्यांनीं आपल्या पायांवर उभें राहून चाललें पाहिजे, त्यांस कोणी उचलून नेणार नाहीं, हें आमच्या राष्ट्रीय शिक्षणाचें धोरण होय. प्रत्येकानें आपल्या स्वतःच्या पायावर उभें रहाण्यास शिकावें, दुसऱ्याचे तोंडाकडे पाहूं नये, असें स्वावलंबनाचें तत्व शिकविण्याकडे आमचा विशेष कटाक्ष असतो. अशा रीतीनें आह्मी बंगाल्यांत काम करीत आहों. ह्या कामीं आह्मांस सरकारच्या मदतीची अपेक्षा नाहीं. सरकारी मदतीच्या योगानें आमच्यामध्यें असलेला राष्ट्रीय जोम नाहींसा होईल. राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें आह्मी काय ह्मणतों हें ना. गोखले यांस आतां समजेल. सुरत शहरीं भरणाऱ्या कांग्रेसच्या बैठकींत राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें स्वतंत्र ठराव कां हवा होता तें आतां स्पष्ट होईल. बंगाल्यांत आह्मीं काय केलें तें आपणापुढें ठेवलें आहे. आह्मीं काय केलें तें तुम्हांस पहावयाचें असेल तर या आणि पहा. राष्ट्रीय शिक्षण ही एक अशक्य गोष्ट आहे, असें म्हणणारांस आह्मी आव्हान करून सांगतों कीं, बंगाल्यांत आह्मीं ती शक्य करून ठेवली आहे. या आणि आपली खात्री करून घ्या. राष्ट्रीय शिक्षण राष्ट्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय देखरेखीखालीं आह्मीं बंगाल्यांत सुरू केलेलें आहे. ह्या कामी आम्हांस तीन जमीनदारांनीं चांगली मदत केलेली आहे. राजा सुबोधचंद्र मलिक यांनीं एक लाख रुपये, मैमनसिंगचे महाराज यांनीं तीन लाख, गोरखपूर येथील जमीनदार यांनीं पांच लाख अशा रकमा दिलेल्या असून राष्ट्रीय शिक्षणास सरकाराकडून एक पै घेतली तर आह्मी आपले सर्व पैसे परत घेऊं, अशा अटीवर त्यांनीं मदत केली आहे. कारण शिक्षणाच्या बाबतींत सरकार जो पैसा खर्च करतें तो लोकांमध्यें एक वि-

बींचा इतिहास सांगितला व तो सांगतांना बंगाली विद्यार्थी प्रथम बहिष्काराबद्दल कशी चळवळ करीत होते, ती चळवळ करीत असतां त्यांस शाळेंतून कसें काढलें, सर्क्युलरें कशीं निघालीं, त्यानंतर राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या शाळा रंगपूर, डाका, किशोरगंज, कोमिला, वगैरे ठिकाणीं कशा सुरू झाल्या, बाबू बिपिनचंद्र पाल ह्यांच्या भाषणांनंतर त्या त्या ठिकाणीं मूठभर तांदुळाची घरोघर भिक्षा मागून कशी मदत झाली, युनिव्हर्सिटीलाही बहिष्कार घालण्याचा मंडळीचा कसा विचार होता, परंतु ठरीव अशा बंगाली पुढाऱ्यांचा ह्या प्रयत्नाबद्दल अविश्वास असल्यामुळें तें काम लांबणीवर कसें पडलें आहे, वगैरे गोष्टी त्यांनीं सांगितल्या. ह्या हकीकतीशिवाय आपल्या भाषणाच्या उपसंहारांत बाबूसाहेबांनीं राष्ट्रीय शिक्षणास राष्ट्रीय देखरेखीची व व्यवस्थेची जरूर काय, राष्ट्रीय देखरेख (National Control) ह्याचा अर्थ तरी काय, वगैरे प्रश्नांचा थोडक्यांत विचार करून प्रो॰ सीलीच्या शब्दांनीं स्पष्ट सांगितलें कीं, राष्ट्रीय (National) व सरकारी (State) हे दोन शब्द अगदीं भिन्न असून हल्लीं सरकारी धोरणानें व मदतीनें आम्हांस शिक्षण मिळत आहे, परंतु तें कांहीं राष्ट्रीय नव्हे, इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय शिक्षणाच्या तें उलटच आहे. सरकारी मदतीनें तयार झालेलीं माणसें सरकारच्याच उपयोगाचीं आहेत. म्हणून सरकारी मदतही आम्हांस नको व तें धोरणही आम्हांस पसंत नाहीं, असें सांगून बाबू अरविंद घोस ह्यांनीं आपलें भाषण आटोपलें. सुमारें सवा तासावर त्यांचें सावकाश व विचारानें पूर्ण असें भाषण चाललें असतां हजारों श्रोत्यांनीं विलक्षण शांत रीतीनें इतका वेळ समग्र ऐकून घेतलें.



## व्याख्यान तिसरें.

# सांप्रतची परिस्थिति.

( तारीख १९ जानेवारी १९०८ रोजीं मुंबईस महाजनवाडींत श्रीयुत अरविंद घोस यांनीं दिलेलें व्याख्यान ).

देशबांधवहो, आज परमेश्वर अध्यक्ष आहे अशी अंतःकरणापासून भावना करून आणि तो जगच्चालक मला प्रेरणा करो अशी प्रार्थना करून मी भाषणास आरंभ करितों. " सांप्रतची परिस्थिति व तिचे उपाय " या विषयावर भाषण करण्यास मला सांगण्यांत आलें. सांप्रतची परिस्थिति काय आहे ? आपल्या देशाची आज काय परिस्थिति आहे ? व्याख्यानाकरितां येण्यास मी निघालों इतक्यांत हें पत्र ( वंदेमातरं पत्राचा अंक दाखवून ) माझ्या हातांत आलें त्याच्या पाहिल्याच पानावर या दोन बातम्या आहेत--एक " युगांतर खटल्याचा निकाल-प्रिंटर दोषी ठरून दोन वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली; " आणि दुसरी बातमी " नवशक्ति आफिसाचा झाडा घेतला. प्रिंटर १०००० च्या जामीनावर खुला आहे. " देशाची आजची परिस्थिति ही आहे. मी काय ह्मणतों हें आपल्या पूर्णपणें ध्यानांत आलें काय ? हिंदुस्थानांत सध्यां एक धर्म निर्माण झाला आहे त्याचें नांव राष्ट्रीयत्व. हा धर्म बंगाल प्रांतांतून इकडे आला आहे. या धर्माचा अंगीकार तुमच्यापैकीं पुष्कळांनीं केला आहे; तुह्मी आपणांस राष्ट्रीय पक्षाचे ह्मणवितां. ' राष्ट्रीयत्व ' ह्मणजे काय याची तुह्मांला ओळख पटली आहे काय ? तुह्मीं कशाचा अंगीकार केला तें तुह्मांस ठाऊक आहे काय ? तुमच्या बुद्धीस हें बरोबर दिसतें ह्मणूनच केवळ याचा अंगीकार केलात काय ? तुह्मीं स्वतःला राष्ट्रीय पक्षाचे ह्मणवतां. राष्ट्रीयत्व ह्मणजे तरी काय ? राष्ट्रीयत्व ह्मणजे कांहीं नुसती राजकीय कामाची पद्धत नव्हे. राष्ट्रीयत्व हा ईश्वरप्रणीत धर्म आहे. ह्या धर्मामध्यें तुह्मांला राहिलें पाहिजे. पोकळ नांवासाठीं राष्ट्रीय पक्षाला मिळूं नका. मी राष्ट्रीय पक्षाचा आहें' असें सांगितल्यानें आपण देशाभिमानी आहों व सांगत नसतील त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ आहों असें बिलकूल मानूं नका. राष्ट्रीय पक्षास मिळावयाचें असेल, जर हा राष्ट्रीयत्वाचा धर्म तुह्मांस संमत असेल, तर भाविक अंतःकरणानेंच तुह्मीं आलें पाहिजे. आपल्या देशाचा उद्धार घडवून आणण्यासाठीं परमे-

श्वरानें आपणांस निमित्त मात्र केलें आहे हें तुह्मीं लक्षांत ठेवलें पाहिजे. कर्ता-करवता परमेश्वर आहे, आपण केवळ निमित्त आहोंत ह्याच बुद्धीनें आपण मरेपर्यंत वागलें पाहिजे. बंगालमध्यें काय प्रकार घडून आला ? तुह्मी आपल्याला राष्ट्रीय पक्षाचे ह्मणवितां पण असा प्रकार घडून आल्यावर तुह्मी काय कराल ? बंगालमध्यें ह्या आतां रोजच्या गोष्टी झाल्या आहेत, कारण राष्ट्रीयत्व हा एक धर्मच आहे असें बंगाली समजतात व तशा दृष्टीनेंच त्यांनीं तो स्वीकारला आहे. ह्या धर्माला प्रतिकूळ अशा कांहीं गोष्टी आहेत व त्या त्याचें वाढत चाललेलें सामर्थ्य चिरडून टाकण्याच्या प्रयत्नांत आहेत. जेव्हां लोकांमध्यें एखादा नवा धर्म प्रसृत होऊं लागतो,—जेव्हां लोकांमध्यें ईश्वरी शक्ति उत्पन्न होऊं लागते, तेव्हां तिला चिरडण्यास अशा हजारों प्रतिकूल गोष्टी उत्पन्न होतात. बंगाल-मध्यें असा नवीन धर्म—दिव्य आणि सात्विक धर्म—उत्पन्न झाला असून तो नाहींसा करण्याचेही नानाविध प्रयत्न सुरू आहेत. अशा कोणच्या सामर्थ्याच्या जोरावर आह्मी या विघ्नांतून जिवंत राहिलों आहोंत ? राष्ट्रीयत्व चिरडलें गेलें नाहीं, तें कधींही चिरडलें जाणार नाहीं. परमेश्वराचा त्याला आधार आहे व कसेही प्रयत्न झाले तरी तें नाहींसें होणार नाहीं. राष्ट्रीयत्व अमर आहे, तें कधींही मरणार नाहीं; कारण ती कांहीं मानवी वस्तु नव्हे. बंगाल्यांत जें कार्य चाललें आहे तें प्रत्यक्ष ईश्वर करीत आहे. ईश्वराला तर कोणी मारूं शकत नाहीं ? त्याला तर कोणी तुरुंगांत टाकीत नाहीं ? असे प्रकार तुमच्याकडे होतील तेव्हां तुह्मी काय कराल ? मी खरोखरच विचारतों, तुह्मी काय कराल ? बंगाली लोक वागतात तसेच तुह्मी वागाल काय ? ( होय. होय. ) उगाच होय ह्मणूं नका. ही गोष्ट थट्टेची नव्हे. ईश्वरच तुह्मांला हा प्रश्न करितो आहे असें समजा. तुह्मी ईश्वराच्या या प्रश्नास काय उत्तर द्याल ? तुह्मी काय ह्मणतां यावर तुमची श्रद्धा आहे काय ? कीं ही नुसती राजकीय महत्वाकांक्षा आहे ? अथवा केवळ मोठ्या प्रमाणावरचा स्वार्थ आहे ? का तुह्मांला असें वाटतें आहे कीं सध्यां आपल्यावर जसा जुलूम चालला आहे तसा आपण पुढें दुसऱ्या राष्ट्रावर करूं ? यापेक्षां उदात्त हेतूनेंच तुह्मी या राजकीय पंथाचे अनुयायी बनला आहां काय ? तुमच्यामध्यें ईश्वर संचारला आहे काय ? आपलीं शरीरें देखील आपल्या स्वाधीन नाहींत—आपण परमेश्वराचे केवळ निमित्त मात्र आहोंत अशी तुमची

श्रद्धा बसली आहे काय? परमेश्वर सर्व कार्य करीत आहे, तुह्मी केवळ निमित्त आहांत असा भरंवसा तुह्मांला आला आहे काय? आला असेल तरच तुह्मी राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी आहां असें ह्मणतां येईल; तरच या राष्ट्राचा उद्धार तुह्मांला करतां येईल. बंगाली लोकांना—कोणाला कमी असेल कोणाला अधिक असेल—ही श्रद्धा उत्पन्न झाली आहे, आणि हीच श्रद्धा तुमच्यामध्यें उत्पन्न झाली पाहिजे. ह्मणजे मग आपल्या कार्यास ईश्वराचा आशीर्वाद मिळेल, आपलें राष्ट्र पुनरपि उदयास येईल आणि प्राचीन काळीं जी धार्मिक उन्नति झाली होती त्या उन्नतीप्रत पुन्हां जाऊन पोंचेल. ( टाळ्या ). भरतखंडाचा ज्ञानदीप नाहींसा होऊं नये, भरतखंडाचा आत्मा मरूं नये, ह्मणून हें कार्य करण्यासाठीं ईश्वरानें तुह्मांला निमित्त केलें आहे. बंगालमध्यें काय झालें तें मी तुह्मांला सांगतों. यापूर्वी बंगाल प्रांत कसा होता तुह्मांला ठाऊक आहे. पूर्वी 'बंगाली' हा एक प्रकारचा अपशब्द होता. लोक जेव्हां बंगालचें नांव काढीत तेव्हां त्यांना काय वाटत असे? आदर वाटत असे काय? प्रेम वाटत असे काय? इतर देशांतले लोक बंगाल्यांना काय ह्मणत होते तें आपणांस ठाऊक आहेच. पण आज तुह्मांला तसें वाटतें काय? पूर्वी जर कोणीं तुह्मांला सांगितलें असतें कीं बंगाल प्रांत हिंदुस्थानचा त्राता होईल तर तुह्मीं त्यावर काडीइतका तरी विश्वास ठेवला असता काय? तुह्मीं हें साफ अशक्य ह्मणून ह्मटलें असतें. हिंदुस्थानचा तारक बंगाल होणार नाहीं; महाराष्ट्र होईल; पंजाब होईल; पण बंगाल कधींही होणार नाहीं; ही कल्पना शुद्ध वेडेपणाची आहे. परंतु, त्या वेळेपासून अलीकडे काय झालें आहे? हा इतका फरक कशानें पडला? पूर्वींचा बंगाली आतां इतका निराळा कसा बनला? बंगालमध्यें एक गोष्ट झाली, व ती ही कीं, बंगालला स्वतःचा भरंवसा वाटूं लागला. युरोपियन सुधारणारूपी मदिरेचें पान बंगालनें आरंभीं यथेष्ट केलें. पाश्चात्य देशांतल्या बुद्धिविषयक शिक्षणाचा केवळ त्यानें स्वीकार केला. सर्व वस्तूंकडे पहाण्यास आणि त्यांवर अभिप्राय देण्यास साधन काय ती एक बुद्धि. पण बुद्धि हें अपुरें साधन आहे. यामुळें जो बंगाल प्रांत पूर्वी देवनिष्ठ होता तो शंकेखोर व नैराश्यवादी बनला. पण हा दोष असतांही बंगाली लोकांत एक प्रकारचा जोम होता. बंगाल्याची ज्यावर निष्ठा बसेल—पुष्कळांची बसत नाहीं—पण ज्याची बसेल तो त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृति करील, तो ब्रह्मसमाजिस्ट असेल, सामाजिक

सुधारक असेल, पण त्याचें जें मत असेल त्याबरहुकूम तो वागेल; मग त्याचे विचार चुकीचे असोत अगर बरोबर असोत. अमुक एक गोष्ट आपल्या देशाच्या उद्धारार्थ जरूर आहे, अमुक एक गोष्ट सत्य आहे व तीप्रमाणें आचरण केलें पाहिजे, असें एकदां त्याच्या मनानें घेतलें ह्मणजे मग तो त्याबद्दल निरर्थक काथ्याकूट करीत बसणार नाहीं. ती गोष्ट केवळ मनोराज्य आहे, आपण ती प्रत्यक्ष कृतींत उतरावी किंवा नुसती मान्य करून कृति करूं नये, इत्यादि विचार करीत न बसतां, काय होईल तें होवो तीप्रमाणें आचरण केल्यावांचून तो कधींही रहावयाचा नाहीं. कोणी एखादा ब्रह्मसमाजिस्ट नसेल सनातनधर्मी असेल, पण आपल्या मतांकरितां जिव्हाळ्याच्या परंतु भिन्न विचारांच्या माणसास तो दूर टाकून देईल. बऱ्यावाईट परिणामांचा विचार न करितां जें यथार्थ वाटतें त्याप्रमाणें तो हटकून आचरण करील. बरें, बंगाली राष्ट्रामध्यें मोठा गुण असा कोणता? तर आतां सांगितल्याप्रमाणें बंगाल्यांची कशाना कशावर तरी निष्ठा असते. निष्ठा केवळ बुद्धिविषयक नसते, केवळ मानसिकही नसते, आपल्या अंतःकरणांतही नाहीं अशी ती कांहीं अपूर्व वस्तु आहे; ती दैवी प्रेरणनें उत्पन्न होत असते; जशी निष्ठा असेल तसें वागणें तुमचें कर्तव्य आहे. परमेश्वर अंतःकरणें वेधून टाकतो, अंतःकरणांत तो वास करतो. यामुळें बंगाल्यांचा बचाव झाला. अशी निष्ठा आमच्यामध्यें होती ह्मणून ईश्वरानें आह्मांस हिंदुस्थानचे संरक्षक ह्मणून पुढें आणलें, आह्मांस अघाडीस ठेवलें, आमच्या निष्ठेकरितां हालअपेष्टा सोसण्यास भाग पाडलें, आपला पाठिराखा ईश्वर आहे या भरंवशावर वाटेल ती गोष्ट करण्यास आह्मीं कां कूं केलें नाहीं. अशा लोकांचें राजकीय सामर्थ्य मोठें नसलें तरी चालेल, ते शक्तिवान् नसले तरी चालतील, ते सर्वांत श्रेष्ठ बुद्धिमत्तेचे नसले तरी चालतील. फक्त ते निष्ठावान् श्रद्धावान् असले ह्मणजे झालें. बंगालमध्यें कांहीं वर्षांमागें विलक्षण धार्मिक प्रगति घडून आली. कांहीं साधुपुरुष निर्माण झाले; जर बंगाल्यांच्या अंतःकरणांत आतां सांगितलेली श्रद्धा नसती तर सुशिक्षितांनीं या साधुपुरुषांस मुळींच ओळखलें नसतें. पण या श्रद्धेमुळें परमेश्वरानें त्यांचे डोळे उघडले आणि पाश्चात्य शिक्षण ज्यांना कःपदार्थ मानील अशा पुरुषांकडे सर्वांचें लक्ष लागलें. या साधुपुरुषांपैकीं एकाचें समाजावर सर्वांत जास्त वजन होतें, बंगालचा उद्धार करण्याकरितां त्यानें सर्वांत जास्त श्रम केले, पण त्याला लिहिण्यावाचण्याचा गंध

देखील नव्हता. सामान्य लोकांच्या दृष्टीनें जगाला तो अगदीं निरुपयोगी मनुष्य होता. पण त्याच्यामध्यें एक दिव्य शक्ति होती, ती ही कीं, त्याची श्रद्धा विलक्षण असून त्याला ईश्वराचा साक्षात्कार झाला होता. लोकांना त्याची वागणूक वेड्या माणसासारखी दिसेल. त्याच्या बुद्धीला शिक्षण मिळालें नव्हतें, बाहेरून पहाणाराला त्याच्या बुध्दीला संस्कार झालेला नव्हता. तो भिक्षावृत्तीनें आपली उपजीविका करीत असे. इंग्रजी शिक्षण मिळालेल्या मनुष्याच्या दृष्टीनें तो समाजाला अगदीं कंटकरूपी नसला तरी निरुपयोगी होय. इंग्रजी शिक्षण मिळालेला मनुष्य त्याला अडाणी ह्मणेल. त्याला काय कळतें ? पाश्चात्य शिक्षणानें परिपूर्ण झालेल्या माझ्यासारख्या माणसाला तो काय शिकवील ? परंतु तो मनुष्य काय उद्योग करीत होता हें परमेश्वराला ठाऊक होतें. त्याला ईश्वरानें बंगाल्यांत धाडून दिलें. तो कलकत्यांत येऊन दक्षिणश्वराच्या देवालयांत राहिला, आणि हजारों सुशिक्षितांच्या—युनिव्हर्सिटीमध्यें नांव गाजवलेल्या माणसांच्या, युरोपियन शिक्षण पूर्ण मिळवलेल्या माणसांच्या—झुंडीच्या झुंडी या साधूच्या चरणीं वंदन करण्यास प्रत्यहीं येऊं लागल्या. एव्हांपासून भरतखंडाला मुक्ति मिळण्याचे कामास आरंभ झाला. यावरून चळवळीचे खरे पुढारी कोण आहेत तें लक्षांत आणा. मी हा मुद्दा तुह्मांला विशेष सांगतों कीं, बंगाल्यांत ज्याच्यावर सत्पुरुषाचा अनुग्रह झाला नाहीं असे फारच थोडे लोक आहेत. विपिन बाबूंवर एका साधूनें अनुग्रह करून या चळवळीच्या कामीं स्फूर्ति दिली आहे. आज ज्या पत्रावर खटला चालला आहे त्याच्या संस्थापकावरही साधूचा अनुग्रह होता. हा संस्थापक एक प्रसिद्ध पुढारी होता, बंगालमध्यें सर्वतोमुखीं त्याचें नांव गाजत होतें, आणि नव्या चळवळीला त्याचें किती तरी उत्तेजन मिळालेलें आहे. हा मनुष्य साधूप्रमाणें राहिला. त्याला ईश्वरी प्रेरणा होती व तिचेंच त्याला पाठबळ होतें. परवां राष्ट्रीय शिक्षणावर मीं तुह्मांला व्याख्यान दिलें आणि तेव्हां राष्ट्रीय शिक्षणास वाहून घेतलेल्या एका माणसाबद्दल मीं तुम्हांला सांगितलें होतें. कलकत्त्याच्या राष्ट्रीय कालेजाची स्थापना त्यानेंच जुळवून आणली. तो एका संन्याशाचा शिष्य असून स्वतः संन्याशाप्रमाणेंच जगांत रहात आहे. ईश्वरी प्रेरणेनें नेमून दिलेलें काम करणाऱ्या बंगालमधल्या तरुण स्वयंसेवकांकडे पहा, ह्मणजे तुह्मांला काय आढळून येईल ? त्यांना एवढा जोर कसला आहे ? त्यांच्या

मार्गांत येणारीं असंख्य विघ्नें सोसण्याचें व त्यांच्यावर होत असलेल्या जुलुमाचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं कोठून येतें ? याबद्दल मी आपल्याला थोडेंसें सांगतों. हिंदुस्थानांत कांहीं लोक आहेत ते राष्ट्रीयत्वाला वेडेपणा मानतात. हे लोक हुषार आहेत, पुष्कळ शिकलेले आहेत, त्यांनीं अर्थशास्त्राचा अभ्यास केला आहे, इतिहासाचा अभ्यास केला आहे,ते संभावित आहेत, ते पुढारी होण्याच्याही योग्यतेचे आहेत. असें असून ते ह्मणतात कीं, राष्ट्रीयत्व हिंदुस्थानचा नाश करील. ते असें ह्मणतात तरी काय ह्मणून ? त्यांच्यापैकीं बरेच जण देशभक्त आहेत, शुद्ध अंतःकरणाचे आहेत, प्रामाणिक आहेत, देशाचें कल्याण व्हावें अशी इच्छा करणारे आहेत. तर मग त्यांच्यांत नाहीं तरी काय ? नाहीं तें हें; कीं त्यांना आजपर्यंत शिक्षण मिळालें तें सर्व बुद्धिविषयक. बुद्धीला काय वाटणार? केवळ बुद्धीच्याच साहाय्यानें वागलांत तर ती काय सांगणार ? तुह्मीं ज्या कार्याला हात घातला आहे तें तर प्रचंड आहे, आणि तुमचीं साधनें तर कुचकामाचीं आहेत. तुह्मांला ज्यांच्याशीं टक्कर द्यायची आहे ते किती तरी बलाढ्य आहेत, त्यांची व्यवस्था, शिस्त, तयारी अगदीं जय्यत आहे, आधुनिक शास्त्रानें तयार केलेलीं सर्व शस्त्रें त्यांच्याजवळ आहेत; सत्ता आणि अधिकार यांचा त्यांना आधार आहे. एवढ्या प्रचंड शत्रूचा प्रतिकार करून यश मिळविण्यास तुमच्याजवळ अशीं कोणतीं साधनें आहेत ? बुद्धिविषयक दृष्टीनें—तर्कशास्त्राच्या दृष्टीनें याचा विचार करा ह्मणजे तुह्मांला निराशेवांचून दुसरें कांहीं दिसणार नाहीं. हे लोक अशाच दृष्टीनें विचार करतात व त्यांना सर्व शून्यवत् भासतें. पण उलट या देशभक्तांकडे पहा. त्यांच्यावर खटले चालले आहेत. त्यांचा प्रतिकार ते कसा करतील ? प्रतिकार त्यांना करितां यावयाचा नाहीं. त्यांना तडक तुरुंगाचा रस्ता धरला पाहिजे. "अशा प्रकारचा प्रतिकार तुह्मी किती दिवस करूं शकाल? असा कांहीं लोक प्रश्न करतात. हा सह्य प्रतिकार किती दिवस टिकेल ? तुमचे सारे पुढारी, सारे सशक्त लोक तुरुंगांत टाकतील, तुह्मी चिरडले जाल, नव्हे तुमचें राष्ट्र चिरडलें जाइल." निव्वळ तर्कशास्त्रानें याचा विचार केला तर हें ह्मणणें बरोबर दिसतें. राष्ट्रीयत्वाच्या धर्माप्रमाणें वागण्याचा हा निश्चय केल्यावर जे तुह्मांला छळण्याच्या उद्योगास लागले आहेत, त्यांचा प्रतिकार करण्याचें कांहीं दृश्य शस्त्र आमच्याजवळ नाहीं. मी ह्मणतों,

दृश्य शस्त्राचा उपयोग होईल, पण जर सर्वस्वीं दृश्य शस्त्रावरच तुम्ही अवलंबून रहाल तर चुकीचें होईल. जर तसें रहायचें असेल तर मग खुशाल राष्ट्रीय चळवळीला ' वेडेपणा ' ह्मणा. सभ्य गृहस्थहो, हा मुद्दा चुकीचा नाहीं काय? राष्ट्रीयत्वापासून जर फायदा नाहीं, तर मग आहे तरी कशापासून? तर्कशास्त्रानें विचार केल्यास—नेमस्तांच्या दृष्टीनें विचार केल्यास—फायदा आहे कशापासून? नेमस्तांचा भरंवसा आहे कशावर? त्यांचा भरंवसा परकीयांवर आहे. जर तुमचा परमेश्वरावर विश्वास नाहीं, जर तुमचा भौतिक सामर्थ्यापेक्षां जास्त जोरदार अशा अदृश्य शक्तीवर भरंवसा नाहीं, तर मग परकी लोक जें देतील तेवढ्यावरच तुह्मांस अवलंबून रहावें लागेल. हिंदुस्थानचा उद्धार करण्यासाठीं परमेश्वर जें करणार नाहीं तें परकी सरकार करील असें ह्मणणारे कांहीं लोक आहेत. **परमेश्वराच्या हातून जें मिळण्याची तुह्मांला आशा नाहीं, तें ब्रिटिश सरकारकडून मिळेल अशी तुह्मी आशा करीत आहां. ही तुमची आशा व्यर्थ आहे. त्यांचे आणि तुमचे हितसंबंध अगदीं वेगळे आहेत; त्यांचा ज्यांत फायदा तीच गोष्ट ते करणार.** यापेक्षां निराळें कांहीं होणार नाहीं. तर मग हें तर्कशास्त्र—हा बुद्धिवाद—तुह्मांला कोणीकडे नेत आहे? जर निव्वळ बुद्धिवादाला शेवटपर्यंत अनुसरलां तर तुह्मांला निराशच व्हावें लागेल. या वादानें तुमचें राष्ट्र ठार होईल. तुह्मांला तर भौतिक सामर्थ्य पाहिजे आणि तें तर तुमच्यापाशीं नाहीं; कांहीं असेल त्याचा चुराडा शत्रु केव्हांच करून टाकतील. आणि तें सामर्थ्य मिळवूं ह्मणाल, तर तुमचे शत्रु कांहीं इतके बोळ्यानें दूध पिणारे खास नाहींत कीं तें तुह्मांला मिळवूं देतील. एकंदरींत निष्कर्ष काय निघतो कीं, आपण करण्यासारखें कांहीं नाहीं, हा देश ठार होणार; हाच निष्कर्ष कीं नाहीं? बुद्धिवादाचा निष्कर्ष शेवटीं हाच निघणार. या विषयावर मी पुण्यास बोललों आणि तेव्हां बंगालचा अनुभव सांगितला. स्वदेशी चळवळीस प्रारंभ होण्याच्या अगोदर तीन चार वर्षें मी बंगाल्यांत गेलों. आपला उद्धार होण्याची कांहीं आशा आहे कीं नाहीं, लोकांची स्थिति काय आहे, खरी चळवळ लोक करूं शकतील कीं नाहीं हें अजमावण्याचा माझा उद्देश होता. त्यावेळेस लोकांमध्यें निरुत्साह व निराशा मला आढळून आली. आपल्या हातून कांहीं होणार नाहीं, आपली उन्नति परक्यांकडून होईल, परकी राष्ट्र हात धरून आपणांस वर

काढील असें पूर्वी लोकांना वाटत असे. आतां असें काडीमात्र देखील कोणाला वाटत नाहीं. परक्यांची मदत व्हावयाची नाहीं हें त्यांना उमजलें आणि नंतर त्यांना कोणाचाही आधार राहिला नाहीं. त्यांच्या बुद्धीला दुसरा आधार सांपडेना आणि साहजिकपणें ते निरुत्साही आणि निराश झाले. जे लोक चळवळीच्या कामांत मनापासून पडले होते त्यांना देखील भरंवसा नव्हता आणि आपलें राष्ट्र बुडणार अशी त्यांची ठाम समजूत झाली होती. लोक असे निराश झाले ही गोष्ट बंगालच्या दृष्टीनें ठीकच झाली, कारण बुद्धिवादानें आपली शिकस्त केली, आतां बुद्धीचा—तर्काचा—कांहीं उपाय नाहीं, तो निरुपयोगी आहे, असें तरी बंगाल्यांत एकदां निश्चित झालें.

बुध्दीच्या हातून निराशेशिवाय दुसरें फळ मिळेना. अर्थात् बुद्धि थकल्यावर अं-तःकरण पुढें सरसावलें व त्यानें ईश्वरी प्रेरणेचा स्वीकार केला. बंगालनें हा नि-रोप एका क्षणार्धांत स्वीकारला, सर्व राष्ट्र क्षणार्धांत खडबडून जागें झालें, भ्रमा-चा आणि निराशेचा निरास झाला; आणि या भ्रमनिरासानें—या जागृतावस्थेनें—बंगालच्या मोक्षाचा मार्ग सांपडला व आपलें राष्ट्र अमर आहे, तें दुःस्थितींत रहाणार नाहीं असें सर्व भरतखंडाच्या नजरेस आलें ( टाळ्या ). बंगालला अशी श्रद्धा उत्पन्न झाली. भौतिक तत्वांपेक्षां जास्त महत्वाचें तत्व बंगालला सांपडलें. कारण परमेश्वरावर श्रद्धा ठेऊन प्रत्यक्ष कृति करणें यापेक्षां महत्वाचें दुसरें कांहीं नाहीं. ईश्वरानिर्मित शक्तीच्या विरुद्ध ईश्वरानेंच उत्पन्न केलेल्या दुसऱ्या शक्तींचा झगडा चालू होतो, तसाच प्रकार नंतर बंगाल्यांत झाला. कारण झगडा केल्यावांचून दैवी शक्तीचें सामर्थ्य वाढत नाहीं. संकटें सोसल्याशिवाय, निर्हेतुक काम केल्याशिवाय, स्वार्थत्यागाचा जोर असल्याशिवाय आपल्या मनांतल्या ईश्वरी प्रेरणेचें सामर्थ्य वाढणार नाहीं. दुसऱ्यांकरितां काम केल्यामुळेंच—असुरांनीं त्रास दिल्यामुळेंच श्रीकृष्णाचें सामर्थ्य नजरेस आलें. ही प्रेरणा बंगालच्या मनांत उद्भवून भावी उन्नतीविषयीं आशा आल्यावर, राष्ट्रीयत्वावर सर्व तऱ्हेचे हल्ले झाल्यानंतर बंगाली राष्ट्रापुढें हा प्रश्न उपस्थित झाला कीं, ' तुम्ही संकटें सोसाल काय ? या हालअपेष्टांतून तुम्ही पार पडाल काय ?' या नवीन उत्पन्न झालेल्या श्रद्धेमुळें जे तरुण सर्व विघ्नांना नाहींसें करण्यास पुढें सरसावले, त्यांना हालअपेष्टा सोसणें भाग पडलें. त्यांच्या वांट्यास यश न येतां सत्य मतांसाठीं मृत्यू आला.

त्यांच्या अंतःकरणांत ज्या सामर्थ्यानें प्रवेश केला होता तें सामर्थ्य कसें आहे याची प्रतीति अद्याप यावयाची होती. तें सामर्थ्य त्यांचें स्वतःचें नव्हतें, ती एक अदृश्य शक्ति होती, त्या शक्तीनें आपण निमित्त मात्र आहों हें त्यांना शिकावयाचें होतें. तर मग आह्मी शिकलों तें काय? आजची जी परिस्थिति मी तुह्मांला सांगत आहें, त्या परिस्थितीला कशाची जरूरी आहे? याला कांहीं राजकीय तयारीची जरूरी नाहीं. मी आजपर्यंत पुष्कळ विषयांवर बोललों, पुष्कळ विषयांवर लेखही लिहिले; स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, गांवपंचायती इत्यादि विषयांसंबधानें लेख लिहिले. पण मीं किंवा माझ्या बरोबरच्या मंडळीनें जो ह्मणून उपदेश केला त्या उपदेशाचा पाया एक निराळेंच तत्व आहे. तें हें कीं, आमच्या देशाचा उद्धार निवळ राजकीय चळवळीनें होणार नाहीं, निवळ राष्ट्रीय शिक्षणानें व्हायचा नाहीं, स्वदेशीनें व्हायचा नाहीं, तर एक बहिष्कारानेंच होईल. नुसत्या स्वदेशीनें थोडीशी भौतिक भरभराट होईल, आणि संपत्तीच्या धुंदीमध्यें, तिच्या आकर्षणामध्यें सांपडून जाऊन ती सुरक्षित राखण्याच्या नादीं मुख्य गोष्ट विसराल. परकी अंमलाखालीं सांपडलेल्या दुसऱ्या देशांतही भौतिक सुधारणा झालेली होती. रोमन साम्राज्यामध्यें भौतिक सुधारणा होती, औद्योगिक प्रगति होती. परंतु भौतिक आणि औद्योगिक सुधारणेनें राष्ट्रांत जीव उत्पन्न झाला नाहीं. जेव्हां परीक्षेचा समय आला तेव्हां हीं औद्योगिक व भौतिक सुधारणेंत गुंतलेलीं राष्ट्रें जिवंत नव्हतीं असें प्रत्ययास आलें. तीं राष्ट्रें मेलेलीं होतीं आणि बाहेरून यत्किंचित् धक्का बसतांच त्यांच्या ठिकऱ्या उडाल्या. याकरितां एखादी विशिष्ट पद्धत आज जरूर आहे असें समजूं नका. हे नुसते काम करण्याचे निरनिराळे मार्ग आहेत, राष्ट्रामध्यें ईश्वरी प्रेरणा जें कार्य चालवीत आहे तिचीं हीं दृश्य स्वरूपें आहेत. पण त्याची कांहीं आज मुख्यतः जरूरी नाहीं. आज मुख्य जरूरी कोणत्या गोष्टीची आहे? जे थोर लोक आज तुरुंगांत गेले आहेत त्यांना कसली मदत आहे? मायाजाळ तोडण्याचें, संकटें सोसण्याचें, विघ्नांचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं कोठून आलें? तें सामर्थ्य एका कल्पनेपासून आलें ती कल्पना ही कीं, **एक अद्भुत प्रतापी दिव्य शक्ति भरतखंडाची उन्नति करीत आहे, आह्मी केवळ त्या शक्तीच्या आज्ञेनें वागत आहोंत.** आपण काय करीत आहों हें पुष्कळदां त्यांना ठाऊक सुद्धां नसतें. आपल्याला कोण प्रेरणा करितो आहे, कि-

वा आपण कोणीकडे चाललों आहों याची त्यांना नेहमीं कल्पना असतेच असें नाहीं पण त्यांची खात्री–अंतःकरणाची, बुद्धिवादाची नव्हे–होती कीं, जी शक्ति आपणांस प्रेरणा करीत आहे ती अजिंक्य आहे, सर्वशक्तिमान् आहे अमर आहे, तिचा कोणी प्रतिकार करूं शकणार नाहीं आणि ती आपलें कार्य हटकून शेवटास नेईल. आपणांस कांहीं करावयाचें नाहीं; फक्त त्या शक्तीची आज्ञा पाळावयाची.ती जिकडे नेईल तिकडे जायचें. ती शक्ति जे शब्द उच्चारण्यास सांगेल ते उच्चारावयाचे. जें करण्यास सांगेल तें करावयाचें. तिनें तुरुंगाकडे बोट दाखविलें कीं तुरुंगांत जायचें. जें जें सहन करण्यास ती सांगेल तें तें आनंदानें सहन करायचें. संकटें सोसून आपणांस काय फायदा आहे इकडे ते लक्ष देत नाहींत, व्यवहारज्ञ लोक हें शहाणपणाचें नव्हे असें सांगतात; या योगानें देशाचें सामर्थ्य कमी होईल, उत्तम कार्यकर्ते नाहींसे होतील, आपलें सामर्थ्य एकवटणार नाहीं, असेंही सांगतात. परंतु बाहेरून दिसणाऱ्या सामर्थ्यापेक्षां राष्ट्रापाशीं कांहीं निराळें सामर्थ्य आहे अशी आमची समजूत आहे. ती एक शक्ति आहे; तिला माझी जरूरी नाहीं, तुझी नाहीं, त्याची नाहीं, बिपिनचंद्र पालची नाहीं, जितके कार्यकर्ते कारागृहांत गेले आहेत त्यांची नाहीं. यांपैकीं कोणीही नको. त्यांना एका बाजूला टाकून दिलें तरी त्यामुळें देशाचें नुकसान होणार नाहीं. सर्व कार्यकर्ता ईश्वर आहे. आह्मी कांहीं करीत नाहीं. जीं संकटें सोसण्याची तो आह्मांला आज्ञा करितो तीं आह्मी सोसतों, कारण आमच्या संकटांनीं इतरांना सामर्थ्य येतें. तो आह्मांला बाजूला टाकतो, कारण आमची जरुरी राहिलेली नसते. जर हा प्रकार असाच चालेल तर नुसत्या कारागृहानेंच भागणार नाहीं, आह्मांला प्राण अर्पण करावे लागतील; आणि जे आज अघाडीस आहेत अगर जे अवश्यक वाटतात त्यांना जरी प्राण अर्पण करण्याचा प्रसंग आला तरी ईश्वराला ती देईल गोष्ट पाहिजे आहे, ती करण्यास त्यानेंच आज्ञा केली आहे, आणि त्यांच्या ऐवजीं तो दुसरे वीर निर्माण करील असेंच आह्मी समजूं. आमचा पाठीराखा तोच आहे. कार्य तोच कार्यकर्ताही तोच. तो लोकांच्या अंतःकरणांत अक्षय राहिला आहे. एकंदरींत बंगालमध्यें काय आहे ती श्रद्धा आहे. ती आपणांमध्यें आहे हें देखील कांहीं जाणत नसतील, कांहीं तिला श्रद्धा हेंच विशिष्ट नांव देत नसतील.

आतां मीं सांगितलेंच कीं, आमच्यामध्यें बुद्धीचा विकास फार झाला आणि ति-चा अद्याप आमच्यावर पगडा आहे. परंतु अलीकडे पुष्कळांमध्यें ही श्रद्धा उत्पन्न झाली आहे; कारण मी देशाकरितां जिवंत रहातों, संकटें सोसतों अशी भावना पुष्कळांना वाटूं लागली आहे. केवळ माझ्यामध्यें ईश्वर नाहीं, तो माझ्या सर्व देशबांधवांमध्यें आहे, ईश्वरावर माझी भक्ति आहे, ईश्वराकरितां मी हाल सोस-तों. अशाप्रकारें ईश्वरानें नेमून दिलेलें काम पुष्कळ करूं लागले आहेत, व मनु-ष्याला कोणती दिशा दाखवावी हें त्यालाच उत्तम समजतें. तो उत्तम दिशाच दाखवील यांत शंका नाहीं.

'श्रद्धे' प्रमाणेंच दुसरी गोष्ट 'स्वार्थाचा अभाव' ही होय. ही बंगा-ल्यांतील चळवळ—ही राष्ट्रीयत्वाची चळवळ स्वार्थहेतुक मुळींच नाहीं. कांहीं जणांना काय वाटेल तें वाटो, पण आह्मी हें राजकीय स्वार्थासाठीं मुळींच करीत नाहीं. हा एक धर्म आहे व त्याप्रमाणें आह्मी आचरण करीत आहों. राष्ट्रामध्यें-देशबांधवांमध्यें—जें ईश्वरी स्वरूप आहे, तें या धर्माचरणानें ओळखतां येतें. आमच्या तीस कोटी लोकांमध्यें असलेलें त्याचें स्वरूप दृग्गोचर होण्यासाठीं आह्मी यत्न करीत आहोंत. स्वार्थाकरितां नव्हे, तर इतरांकरितां काय कर-ण्यासाठीं आणि मरण्यासाठीं आह्मी—कांहीं जण जाणूनबुजून कांहीं जण अजा-णतां—प्रयत्न करीत आहों. एखाद्या तरुण बंगाल्याला तुरुंगांत जावें लागलें, हाल सोसावे लागले, तर त्याला मुळींच दुःख वाटत नाहीं; तो हालअपेष्टांना भीत नाहीं. तो आनंदानें पुढें सरसावतो. तो आपल्या मनाशीं ह्मणतो, "माझें काम संपण्याची वेळ आली, ईश्वराच्या यज्ञभूमीवर मला जाण्याची वेळ आली, आणि देशबांधवांच्या कल्याणाकरितां हाल सोसण्याचें काम मजकडे आलें हे त्याचे माझ्यावर उपकार आहेत. आज मला अत्यानंद होत आहे; माझ्या जन्माचें आज सार्थक झालें." राष्ट्रीयत्वरूपी धर्माचें हें दुसरें स्वरूप आहे. मी ह्मणून कोणी विशिष्ट नाहीं, तीस कोटी लोक ह्मणजेच मी आणि ह्मणजेच परमेश्वर.

तिसरी गोष्ट 'धैर्य' ही होय. 'श्रद्धा' किंवा 'स्वार्थाभाव' यांचेंच हें तिसरें नांव आहे ह्मटलें तरी चालेल. ईश्वरावर तुमचा विश्वास असला, ईश्वर आपला मार्गदर्शक आहे अशी श्रद्धा असली, ह्मणजे मग ईश्वरच सर्व करील

आहे, तुह्मी कांहीं करीत नाहीं, मग भय तरी कसलें? दुसऱ्यांच्या हिताकरितां स्वतःची पर्वा करावयाची नाहीं, आपलें द्रव्य, शरीर, सर्वस्व द्यावयाचें, किंबहुना प्राणही अर्पण करावयाचा हा एकदां तुमचा धर्म झाला ह्मणजे मग तुह्मांला भय कसलें उरलें? कशाचेंही भय नाहीं. या जगांतल्या न्यायासनापुढें तुमची चवकशी चालली असतांना तुमचें धैर्य तिळमात्रही खचणार नाहीं. कारण तुमचा 'धर्म'च सांगतो आहे कीं तुह्मी धैर्यवान् आहां. एकदां हा राष्ट्रीयत्वरूपी धर्म स्वीकारला ह्मणजे मग तुमचेपण निघून जाऊन तुह्मी ईश्वरस्वरूपीच बनतां, आणि ह्या चवकशा किंबहुना हें सर्व जग हृदयस्थ ईश्वराला काय करूं शकेल? जो अमर आहे, ज्याला जननमरण नाहीं, ज्याला तरवार इजा करूं शकत नाहीं, अग्नि जाळूं शकत नाहीं, उदक बुडवूं शकत नाहीं, त्याला या जगांतले नश्वर शत्रू काय करूं शकतील? त्याला तुरुंग तुरुंगांत अडकवूं शकत नाहीं, फांस फांसावर चढवूं शकत नाहीं. आपल्या अंतःकरणांमध्यें ईश्वर वास करीत आहे अशी निष्ठा असल्यावर तुह्मांला भीति कसली? अर्थातच धैर्य असणें जरूर आहे, धैर्य असणें स्वाभाविक आहे, धैर्य असणें अपरिहार्य आहे. जर युरोपियन दृष्टीनें-ह्मणजे फक्त-भौतिक दृष्टीनें—राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी असाल, ह्मणजे परक्यांचें राज्य काढून दुसऱ्या कोणाचें आणावयाचें असेल—तर तुह्मी फक्त भौतिक दृष्टीनें बदललां आहां; ही दृष्टी कांहीं धर्म नव्हे; याचा असा अर्थ होत नाहीं कीं, तीस कोटी लोकांसाठीं तुह्मीं हळहळत आहां, त्यांचा तुह्मांला उद्धार करावयाचा आहे, त्यांचें तुह्मांला कल्याण करावयाचें आहे. याचा अर्थ एवढाच होईल कीं, हे राज्यकर्ते परकी आहेत, ह्यांच्या जागीं आपण असावें एवढीच तुमची इच्छा आहे; तुह्मांला देशाचें स्वातंत्र्य नको, तर परक्यांचें राज्य जाऊन तुमचें राज्य व्हावें. जर अशा बुद्धीनें तुह्मी काम करीत असाल तर कोर्टामध्यें तुह्मी कसे टिकाल? त्यावेळीं तुमच्या अंगीं धैर्य कोठून येईल? त्या खटल्यास तोंड देण्याची तुमची छाति होईल काय? तुह्मी केवळ बुद्धिवादानें राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी होतां असें तुमच्या लक्षांत येईल. परीक्षेची वेळ आली ह्मणजे तुमचें मन तुह्मांला काय ह्मणेल? तुमची बुद्धि तुह्मांला काय सांगेल? ती सांगेल, " देशाकरितां झटणें हें सर्व ठीक आहे; पण इकडे मी मरतों आहें, मला त्रास होत आहे, याचा कांहीं फायदा असला तरी तो मला कसा मिळणार? मी तर मरून जाईन! दुसऱ्यांना हो-

णाऱ्या सुखाकरितां मी काय ह्मणून हाल सोसावे ? हें माझें घर आहे, ही माझी इष्टेट आहे, या सगळ्यावर धाड येईल; तेव्हां आपण या भानगडींत पडूं नये. जर तुमच्यामध्यें ईश्वरावरील श्रद्धा आणि स्वार्थाचा अभाव नसेल, तर या इतर मायाजालाचा त्याग करावासें तुह्मांला वाटणार नाहीं. स्वतःला ज्यापासून फायदा नाहीं त्याकरितां संकटें सोसावीं असें वाटणार नाहीं. असें असल्यावर ' धैर्य ' कोठून येणार ? परंतु जर तुमच्यामध्यें दिव्य कल्पना असेल, आपणांजवळ कांहीं नाहीं, आपण कोणी नाहीं, तीस कोटी लोक हेच ईश्वर आहेत, त्याचें परिमाण करतां येणार नाहीं, तर तुह्मांला कळेल कीं, आपण कांहीं तरी शाश्वत वस्तू-करितां सर्व करीत आहों; शाश्वत शक्ति आपल्या हातून सर्व कांहीं घडवून आणीत आहे. ह्मणजे मग कोणचीही माया तुह्मांला हरकत करूं शकणार नाहीं. तुमच्या मनांत दुसरा कोणताही विचार येणार नाहीं, धैर्य आपोआपच उत्पन्न होईल, तें आणण्याचें कारण पडणार नाहीं. त्या दिव्य शक्तीच्या आज्ञेनेंच तुह्मी काम कराल. ती शाश्वत शक्ति तुमचें सर्वकाळ रक्षण करील. प्रत्यक्ष मरणसमयीं आपण अमर आहोंत अशी तुह्मांस खात्री वाटेल. दुःखें सहन करीत असतांना आपल्याला त्रास देण्याचें कोणाचें सामर्थ्य नाहीं असें तुह्मांला वाटेल.

ह्या तीन गोष्टी सांप्रतच्या परिस्थितीला अवश्यक आहेत हें मीं सांगितलें. कारण परिस्थिति आहे ती अशी आहे.—तुह्मीं एक कार्य आपल्या शिरावर घेतलें आहे. जें कार्य वर वर पहाणाराला अशक्य दिसतें तें कार्य करण्याचें तुह्मीं अंगावर घेतलें आहे. या प्रयत्नामुळें जगांतले अतिशय सामर्थ्यवान् शत्रू तुह्मांला निर्माण होतील. प्राचीन काळीं जेव्हां ईश्वर अवतार धारण करी तेव्हां अतिशय बलाढ्य असुरांचाही जन्म झालेला असे. तुह्मी हें पक्कें लक्षांत ठेवा कीं, तुह्मी हा राष्ट्रीयत्व धर्म अंगीकारलात कीं, या जगांत कोणालाही अपरिहार्य असे भौतिक शत्रू तुह्मांला उत्पन्न होतील. परीक्षेची वेळ लांब नाहीं, ती आलीच आहे. या वेळीं बुद्धिमत्तेचा काय उपयोग होणार ? वरवर उत्साह असला तर तो कितीसा उपयोगी पडेल ? नुसतें ' वंदे मातरं ' ओरडण्यानें काय होणार ? परीक्षेच्या वेळीं या बाह्य देखाव्याचा काय फायदा ? बंगालमध्यें जे लोक संकटें सोशीत आहेत त्यांच्या जागीं आपण आहोंत असें समजा, ते धैर्यवान् आहेत कीं नाहींत तें लक्षांत आणा, आणि त्यांच्याप्रमाणें आपल्यावर प्रसंग आल्यास त्याला

तोंड देण्याचें आपल्या अंगीं सामर्थ्य आहे कीं नाहीं तें पहा. कशाच्या जोरावर आपण त्याला तोंड देऊं, आपण त्यांत यशस्वी कसे होऊं, याचा पुरता विचार करा. मीं आतां दाखविलें कीं, भौतिक सामर्थ्यानें त्या प्रसंगाला तोंड देतां येणार नाहीं. याशिवाय दुसऱ्या प्रकारचें सामर्थ्य तुमच्यामध्यें आहे काय ? राष्ट्रीयत्व ह्मणजे काय याची तुह्मांस कल्पना आली काय ? ' तो एक धर्म आहे व त्याचा आपण अंगीकार करीत आहों ' अशी तुमची खात्री आहे काय ? जर असेल तरच आपणांस राष्ट्रीय पक्षाचे अनुयायी ह्मणवा, आणि त्याप्रमाणें यावज्जीव आचरण करण्यास तयार व्हा. आपलें अंत:सामर्थ्य ओळखा, व जें कार्य कराल तें तुह्मीं न करितां तुमचा अंतरात्मा करील अशा तऱ्हेनें तें सामर्थ्य जगास दाखवा. तुमच्या अंत:करणांत जी शाश्वत दिव्य शक्ति आहे ती घटकोघटकीं दृष्टोत्पत्तीस येईल, तुमचा प्रत्येक विचार तिच्या प्रेरणेनें होईल, तुमच्या अंगीं जो जो गुण असेल त्याचा उपयोग तिच्याकडेच होईल अशा प्रकारचें वर्तन ठेवण्याविषयीं झटा ह्मणजे मग तुह्मी अशी तक्रार करणार नाहीं कीं, लोक आळशी आहेत, ते ही कल्पना लवकर ग्रहण करीत नाहींत, आमचे पुढारी चांगले नाहींत, आमच्यांतले मोठे लोक निराळाच मार्ग दाखवितात. अशा प्रकारच्या तक्रारी तुह्मी मुळींच करणार नाहीं, कारण मग तुह्मांला कोणा पुढाऱ्याचीच जरूर रहाणार नाहीं. **तुमच्या हृदयांत तुमचा पुढारी आहे.** त्याला ओळखून तो सांगेल तसें वागल्यास लोक तुमचें ऐकल्यावांचून रहाणार नाहींत. ती प्रेरणा व तें सामर्थ्य तुमच्या हृदयांतच आहे. जर ही स्वत:ची शक्ति तुह्मी ओळखाल, जर तिच्या सन्निध तुह्मी रहात असाल, जर तिच्याशीं तुह्मी एकरूप झाले असाल तर खात्रीनें तुह्मांला आढळून येईल कीं, लोक तुमचें ह्मणणें मान्य करतील, तुमच्या सांगण्याप्रमाणें वागतील, तुह्मी जो मंत्र सांगाल तो सर्व जण स्वीकारतील, आणि शेंपन्नास वर्षें नाहींत तर फारच थोड्या अवधीमध्यें बंगालप्रमाणें अवघ्या तीन वर्षांत सर्व गा[illegible] बदलेल, त्यामध्यें नवीन जोम उत्पन्न होईल, सर्वत्र आपल्या राष्ट्राचें गाजूं लागेल. राष्ट्रीयत्वाचा मंत्र बंगालकडून आला, ह्याचें उदाहरणही बंग घालून दिलें. ज्या बंगालला कोणी मान देत नसे, आणि ज्यामधील हिंदुस्थानांत सर्वांत नेभळे मानण्यांत येत असत, तोच बंगाल तीन वर्ष

आंत विलक्षण बदलला आहे. याला कारण फक्त एवढेंच कीं, आपल्या हृदयामधील ईश्वरी स्वरूप ओळखण्यास ज्यांना सांगितलें त्यांनीं तें ओळखलें, त्या ईश्वरी शक्तीकरितां हाल सोसले, तिच्या आज्ञेप्रमाणें आचरण केलें आणि आपल्या आचरणानें इतरांसही उदाहरण घालून दिलें. अशा रीतीनें तीन वर्षांत बंगालमध्यें विलक्षण अंतर पडलें आहे व जो तो आश्चर्यानें थक्क होऊन विचारीत आहे कीं, " बंगाल्यांत हें चाललें आहे तरी काय ? " कोणत्याही विघ्नानें ही चळवळ थांबत नाहीं, कोणत्याही सामर्थ्यानें ही प्रगति नाहींशी होत नाहीं, राष्ट्रामध्यें नवीन अवतार जन्मास आला आहे, आणि जर तुह्मीं आपल्या अंतःकरणांत वसत असलेल्या ईश्वराचें स्वरूप जाणलें असेल, तर यापेक्षांही थोडया काळांत ईश्वर सर्व भरतखंड बदलून टाकील. कारण ही दिव्य शक्ति आधींच प्रगट झाली आहे व ती आपलें कार्य आतां जास्त जास्त जोरानें करूं लागेल. सर्व जगाच्या ती दृष्टोत्पत्तीस येईपर्यंत, सर्व जगाला ती समजे पर्यंत तिचें कार्य अखंड चालेल. गोकुळांत—गरीब लोकांत— ज्यांना कोणी मान देत नाहीं अशा लोकांमध्यें असलेला—वृंदावनच्या गोपाळांमध्यें असलेला— श्रीकृष्ण आपलें माहात्म्य प्रगट करील, हें राष्ट्र उदयास येईल, या देशांतील लोकांचा उद्धार होईल, त्यांच्यामध्यें ईश्वरी प्रेरणा होईल, जगामध्यें कोणीही त्यांना प्रतिबंध करूं शकणार नाहीं, त्यांच्या मार्गामध्यें कोणालाही अडथळा आणतां येणार नाहीं. आपणांस ईश्वर सहाय आहे, हें ईश्वराचें काम आहे, तो आपल्याकरितां हें कार्य करीत आहे. उच्चपदास चढलेल्या आपल्या प्राचीन राष्ट्राकरितां त्यानें एक महत्वाचें कार्य राखून ठेवलें आहे. तो तें करण्यासाठीं पुन्हां तुमच्यामध्यें निर्माण झाला आहे. तें हें कीं, इतर राष्ट्रांप्रमाणें तुह्मी उन्मत्त न होतां, गरीबांना पायाखालीं न तुडवितां, सर्व जगाचा उद्धार [illegible]ण्यासाठीं तुह्मीं ' कांहीं तरी ' करावें. तें ' कांहीं तरी ' तुमच्या प्राचीन ऋ[illegible] ओळखून प्रगट केलें आहे, तेंच तुह्मी पुन्हा ओळखा आणि प्रगट करा, [illegible]गास प्रगट करा; आणि परमेश्वरानें स्वतः प्रगट व्हावें एवढ्याकरितां तुम[illegible]तःकरणांत असलेलें त्याचें स्वरूप ओळखा, तुह्मी आपलें जीवित पवित्र [illegible]पल्या राष्ट्राचें करा; ह्मणजे तुमच्या राष्ट्राच्या द्वारें ईश्वर जगापुढें प्रगट [illegible]णि तुमचें कार्य संपेल. हेंच कार्य तुह्मांस करावयाचें आहे. यावरून

तुमच्या लक्षांत येईल कीं, सध्यांची चळवळ केवळ राजकीय नव्हे, हें ईश्वरानें नेमून दिलेलें कार्य आहे.

---

## व्याख्यान चवथें.

## ' स्वराज्य '

( नाशिक येथें झालेलें व्याख्यान. )

" मी आजपर्यंत लेखक या नात्यानें माहीत होतों. वक्ता या नात्यानें माझी कोणास ओळख नव्हती. परंतु परिस्थितीच्या योगानें मला तसें होणें भाग पडलें आहे. आजचे व्याख्यानाचा विषय मीं अद्याप ठरविलाच नव्हता. परंतु कांहीं मित्रमंडळीचा आग्रह मीं ' स्वराज्य ' या विषयावर बोलावें असा पडला असल्यामुळें मीं त्याच विषयावर बोलण्याचें योजिलें आहे. अलीकडे दोन तीन वर्षांमध्यें आपल्या सुदैवानें या आपले देशांत नवीन चळवळ उर्फ नवीन शक्ति उत्पन्न झालेली आहे. या चळवळीचें अंतिम ध्येय काय आहे हें बरेच दिवस मुग्धावस्थेंत होतें. पण गतवर्षी कलकत्त्याचे कँग्रेसचे अध्यक्ष वृद्ध देशभक्त दादाभाई नौरोजी यांनीं आपले भाषणांत तें ध्येय ' स्वराज्य ' ह्मणून सांगितलें; ' स्वराज्य ' ह्मणजे कोणत्याही देशांतील लोकांनीं आपल्या देशांतील लोकांच्या कल्याणाकरितां आपल्या स्वताच्या पद्धतीवर चालविलेलें राज्य, तें स्वराज्य होय. हें आपलें खरें अंतिम साध्य आहे. ही खरी गोष्ट आपण आजपर्यंत विसरून गेल्यामुळेंच आपण अशा अधोगतींत येऊन पडलों. आतां आपलें अंतिम ध्येय आपणांपुढें असूनही जर आपण त्याची ओळख करून घेणार नाहीं तर आपण तीस कोट लोक अगदीं नामशेष होऊन जाऊं. तुह्मां महाराष्ट्रीयांना ' स्वराज्या ' ची थोडी तरी आठवण असेल, कारण शंभर वर्षांपूर्वी ' स्वराज्य ' ही तुमच्या अनुभवांतली गोष्ट होती. स्वराज्य हा जीव आहे, स्वराज्य हें अमृत आहे, स्वराज्य ही मुक्ति आहे. शरीरास जसा प्राणवायु तसेंच स्वराज्य हें राष्ट्राचें जीवन आहे. जसा प्राणवायु नाहीं तर प्राणी जिवंत नाहीं, तसेंच ' स्वराज्य ' नाहीं तर राष्ट्रही जिवंत नाहीं. स्वराज्य नसलेल्या राष्ट्राची स्थिति कशी होते हें इतिहासावरून समजण्यासारखें आहे. पूर्वीं रोमन साम्राज्याचा

आमच्याप्रमाणें त्यांनाही सुरक्षित होतां. पण दुःखाची गोष्ट अशी कीं, त्या इतर देशांचा प्राणवायु जें 'स्वराज्य' तें त्या देशांत नसल्याकारणानें ते देश सुखें भोगीत असूनही मेल्याप्रमाणेंच होते. कारण पुढें कांहीं कारणानें रोमन राष्ट्र बुडालें व त्याबरोबर सर्व साम्राज्याचें रक्षण करणारीं सैन्येंही पण नष्ट झालीं. अर्थात् त्याचे ताब्यांत असलेल्या इतर देशांतील लोकांस स्वराज्य नसल्यानें कोणी वाली राहिला नाहीं. मग वाटेल त्या रानटी लोकांनीं त्यांस हवें तसें छळलें. पुढें अनेक शतकांनीं जेव्हां ते लोक आपले पायावर उभे राहून त्यांनीं 'स्वराज्यें' स्थापिलीं तेव्हां ते लोक सुखी झाले. स्वराज्य ही अतिशय आवश्यक वस्तु आहे. ती दुसऱ्यांनीं देण्यापेक्षां आपली आपणच मिळवावी लागते. स्वराज्य मिळविण्याचे दोन मार्ग आहेत. एक ज्यांच्यापाशीं आपलें राज्य आहे त्यांजपासून भीक मागून तें मिळविणें किंवा दुसरा मार्ग ह्मणजे कोणा जवळच्या परराष्ट्राची मदत घेऊन तें मिळविणें. यांपैकीं पहिल्या प्रकारानें तें मिळणें मुळींच शक्य नाहीं. तो निव्वळ मूर्खपणाच आहे. भीक मागून स्वराज्य मिळविण्याची आशा धरून बसलेला एक वर्ग अजूनही आपल्यांत आहे, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. हिंदुस्थानामुळेंच ज्यांची योग्यता वाढली आहे, ज्यांचा देश संपन्न झाला आहे व होत आहे तो हिंदुस्थान देश इंग्लिशांचे हातांतून गेला ह्मणजे ते नामशेषच झाले ह्मणून समजावें. असें असतां इंग्लिश लोक आमचे हातीं स्वराज्य देतील ही कल्पना करणेंच मुळीं मूर्खपणाचें आहे. आजपर्यंत अशा कल्पनेवर विश्वास ठेवून आह्मी अधोगतीस तर गेलों आहोंतच पण नामशेषही होऊं. आतां दुसऱ्या तऱ्हेनें स्वराज्य मिळवूं ह्मणणें ह्मणजे आगींतून निघून फोपाट्यांत पडण्यासारखें आहे. कारण ज्यांची मदत घेणार तेही पण मनुष्यप्राणीच असल्याकारणानें त्यांचाही लोभ आडवा येणारच. तेव्हां एकंदरींत आमचें आह्मींच स्वराज्य मिळविलें पाहिजे.

हें स्वराज्य मिळवावें कसें? स्वराज्य मिळविण्याचीं साधनें आपणापाशीं नाहींत, व तें मिळालें अशी कल्पना केली तर तें राखण्याची तरी आपणांत शक्ति

स्वतंत्र झाल्याखेरीज स्वतंत्रता मिळत नाहीं. परमेश्वरानें प्रत्येक प्राण्याला नैसर्गिकच स्वतंत्र केलें आहे. अर्थात् या परमेश्वरी हक्कानें प्रत्येक जण स्वतंत्रच आहे अशी मनाची भावना झाली पाहिजे, व परमेश्वराविषयीं पूर्ण विश्वास असला पाहिजे. नंतर ही स्वतंत्रपणाची भावना राष्ट्रीय शिक्षणद्वारें सर्व राष्ट्रभर पसरविली पाहिजे. न्याय व अंमलबजावणीचीं कामें लोकांनीं आपले हातीं घेतलीं पाहिजेत. ह्मणजे पंचांमार्फत आपल्या तक्रारींचे निकाल लावून घेतले पाहिजेत. स्वदेशी आणि बहिष्कार या दोन उपायांनीं आह्मीं आमचा व्यापार वाढविला पाहिजे. हे दोन उपाय गेल्या दोन वर्षांत येथें बऱ्याच जारीनें सुरू झाल्यामुळें किती तरी फरक पडला आहे. याच दोन उपायांचे जोरावर आह्मी आपली सांपत्तिक उन्नति करून घेऊं अशी आमची खात्री आहे. या तिन्ही गोष्टी आह्मीं बंगाल्यांत सुरू केल्या आहेत, व आह्मांस चांगलें यशही येत चाललें आहे. इतकें केलें ह्मणजे आह्मीं निम्मे स्वराज्य मिळविलें. आतां इतकें करीपर्यंत प्रतिपक्ष निजला राहील असें मुळींच नाहीं. परंतु आमची अशी भावना आहे कीं, स्वराज्याकरितां धडपड करणें ही ईश्वराची आज्ञा आहे. व ती आह्मीं पाळलीच पाहिजे. ही भावना आमच्या बंगाली लोकांमध्यें इतकी जाज्वल्य आहे कीं, आमच्या मूठभर शत्रूंनीं उत्पन्न केलेल्या दंड, तुरुंग, फांशी, हद्दपारी इत्यादि संकटांचें आह्मांस कांहींच वाटत नाहीं. एखाद्या बंगाली मुलाला जर अशा कामीं शिक्षा झाली तर तो हंसत हंसत ह्मणतो कीं, कांहीं हरकत नाहीं, आह्मी आमच्या अंतिम साध्याची वाट एक पाऊलभर पुढें चालून गेलों. तर हे महाराष्ट्रवासीयांनो, ज्याअर्थीं तुमचें व आमचें ध्येय एकच आहे, व आह्मीही आर्यभूमीचीं लेंकरें आहोंत, त्याअर्थीं तुह्मी, आह्मी व इतर प्रांतांतील लोक मिळून ईश्वराच्या आज्ञेप्रमाणें घडवून आणण्याच्या तयारीला लागूं या. आमची सर्व भिस्त तुमच्यावर आहे. कारण थोड्या काळापूर्वीं तुह्मी शूर शिपाई होतां व स्वराज्याचाही उपभोग घेत होतां. तुमच्या महाराष्ट्रांत जेव्हां मुसलमा-



रानें भगवद्गीतेंत दिलेल्या वचनाप्रमाणें शिवाजी महाराजांचे रूपानें अवतार घेऊन दुष्टांपासून देशाचें संरक्षण केलें व देश स्वतंत्र झाला. हल्लींही तशीच स्थिति आहे. ही ईश्वरी प्रेरणा आहे. ही चळवळ कांहीं मनुष्यांनीं उत्पन्न केलेली नाहीं. ही परमेश्वराची आज्ञा आहे. ही आज्ञा पाळण्यास आपण एक झालें पाहिजे. आपण दृढ भावना धरून सत्याकरितां व आपल्या नैसर्गिक हक्कांकरितां ३० कोटी लोक एकत्र झालों म्हणजे, या आपल्या प्रचंड झंझावातापुढें, वाऱ्यानें राखेचा पर्वत जसा कोणीकडच्या कोणीकडे नाहींसा होतो, तशी आपल्यास अडवूं पाहणाऱ्यांची स्थिति होईल. आपल्या प्रत्येकाचे शरीरांत ईश्वरी अंश आहे. या प्रत्येकाच्या शरीरांतील ईश्वरी अंशाचें तेज कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत एकवटलें असतां वेदांत वर्णन केलेल्या विराट पुरुषाचेंच तेजःपुंज स्वरूप एकदम उभें राहील. परमेश्वराची आज्ञा पाळण्याची दृढ भावना मनांत धरून त्याचें हें विराट स्वरूप आपण धारण केल्यावर आंग्लोइंडिअन म्हणतात त्याप्रमाणें कित्येक शतकें तर राहोतच, पण आपले मवाळ बंधु म्हणतात तीं शंभर वर्षें सुद्धां न लागतां माझी अशी खात्री आहे कीं, [illegible]ध्या १०–२० वर्षांत आपण आपलें जें अंतिम साध्य 'स्वराज्य' तें खात्रीनें मळवूं. आम्हीं बंगाली लोकांनीं तर हा उपक्रम सुरू केलाच आहे. ज्या इं[illegible] शांनीं आम्हांस नेमळट अशी पदवी दिली आहे, त्यांना आतां आम्ही नेमळ[illegible] नसून कसे शूर आहोंत हें लवकरच दिसून येईल."

---

### व्याख्यान पांचवें.

## राष्ट्रीय पक्षाचें धोरण.

### (नागपूर.)

माझे प्रिय देशबांधवहो, मी सुरतकांग्रेसला जात असतां वाटेंत येथें उतरलों होतों तेव्हां आपल्या पुढें चार शब्द बोललों होतों. त्यावेळीं कांग्रेस व्हावयाची होती.

राष्ट्रीय पक्ष सुरतेस जमला,तो कांग्रेस मोडण्यासाठीं जमला होता, त्यांना कांग्रेस नको होती,कांग्रेस मोडण्याचा त्यांचा बेत पूर्वीपासून ठरला होता, अशीं बेधडक विधानें कित्येक पक्षाभिमानी पत्रें करूं लागलीं आहेत. परंतु मी आपणास असें विचारतों कीं, आमच्या नॅशनालिस्ट पक्षाला कांग्रेस मोडून काय बरें फायदा होता? राष्ट्रीय पक्षाला कांग्रेस पाहिजे होती; ह्या कांग्रेसच्या द्वारेंच आमच्या राष्ट्रीय मतांचा प्रसार आह्मांस करावयाचा होता. असें असतां कांग्रेस मोडून आह्मांस काय मिळणार होतें ? कांग्रेसच्या संबंधानें कित्येक जुन्या पक्षाच्या पुढाऱ्यांचीं अनेक पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत एकानें असें विधान केलें आहे कीं, बंगाल नॅशनालिस्ट पक्षाला कलकत्त्यांतील'हेडक्वार्टर्स'मधून कांग्रेसच्या पहिल्या दिवशीं अशी तार आली होती कीं, Break up the congress if everything fails जर इतर बाबतींत जुळलें नाहीं, तर कांग्रेस मोडा, कांग्रेसचे तुकडे करा ! अशा प्रकारची तार आल्याचें विधान ऐकून आह्मांस मोठें आश्चर्य वाटलें ! नॅशनॅलिझमचें हेड कार्टर्स ह्मणजे काय ? राष्ट्रीय धर्माचें क्वार्टर्स एखाद्या शहरांत नाहीं, तें कलकत्यास नाहीं, तें पुण्यास नाहीं, तें सर्व राष्ट्रभर पसरलेलें आहे ! सबंद राष्ट्र हेंच राष्ट्रीय धर्माचें आदिस्थान आहे. असें असतां कलकत्यांतील हेडक्वार्टर्स ह्मणजे कोणतें ? वरील तार कोणाकडून गेली, असें या मवाळ मंडळीस ह्मणावयाचें आहे? बंगाल्यांतील राष्ट्रीय पक्षाचे अग्रणी—आमचे पुढारी हें राष्ट्रीय धर्माचें 'हेड क्वार्टर्स' असें धरून चालल्यास कलकत्यास असें कोणतें 'हेड क्वार्टर्स' राहिलें होतें ? पुढारी हेडक्वार्टर्स समजल्यास आमचें एक हेडक्वार्टर्स सध्यां बक्सारच्या तुरुंगांत आहे, ( बाबू बिपिनपाल ) आणि दुसरें हेड क्वार्टर्स सुरतेस होतें ( अश्विनीकुमारदत्त ? ) ! अशा प्रकारची तार राष्ट्रपक्षास आलेली नाहीं. गृहस्थहो, वरील विधान सपशेल खोटें आहे ! राष्ट्रीय पक्षास राष्ट्रीय सभा मोडावयाची नव्हती व ती त्यानें मोडलीही नाहीं. मी कोणास दोष देत नाहीं. पण मी असें विचारतों, कांग्रेस मोडून आम्हांस काय मिळणार होतें; कांग्रेस मोडून दुसऱ्या पक्षाशीं आपला संबंध तोडल्यास सरकार आह्मांवर थोडेंच खुष होणार होतें ?

सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतून ज्या लोकनियुक्त व लोकनियंत्रित संस्था आहेत, त्यांत प्रत्येक सभासदास कोणत्याही प्रश्नावर आपलें मत पुढें मांडण्याचा पूर्ण अधिकार सार्वजनिक संस्थांच्या सर्वमान्य नियमांनुसार मिळालेला आहे. हा अधिकार—हा प्रत्येक सभासदाचा निसर्गसिद्ध हक्क—दाबून टाकण्याची सत्ता कोणाही अध्यक्षास नाहीं. अध्यक्ष हा जमलेल्या सर्व लोकांनीं नेमलेला सभेचा नोकर आहे. त्यानें कसें वर्तन ठेवावें, ह्या संबंधाचे नियम आहेत. ह्या नियमांचें अतिक्रमण कोणाही अध्यक्षानें करतां कामा नये. त्याला मतस्वातंत्र्याची किंवा भाषणस्वातंत्र्याची दडपादडपी करतां येत नाहीं. असा हा जगन्मान्य सिद्धांत असतां सभेंतील एका सभासदाचा हक्क हिरावून घेण्याचा प्रयत्न कोणीं केला ? आह्मां राष्ट्रीय पक्षानें केला कीं आमच्या प्रतिपक्षानें केला ? योग्य वेळीं नोटीस पाठविली असतां आमच्या पक्षाच्या पुढाऱ्यास न बोलूं देण्यामुळें सभेच्या सर्व-मान्य नियमांचें उल्लंघन कोणीं केलें ? आह्मी राष्ट्रीयसभा मोडण्यासाठीं सुरतेस गेलों, असें ह्मणणारांनीं वरील प्रश्नाचा विचार केला पाहिजे. दुसरी महत्वाची गोष्ट अशी आहे कीं, कांग्रेस ही सर्व हिंदुस्थानच्या लोकांची—सर्व राष्ट्र-हितेच्छु लोकांची संस्था आहे. जे जे ह्मणून राष्ट्रहिताकरितां खटपट करितात, त्या सर्वांस त्या संस्थेंत स्थळ मिळालें पाहिजे. ज्याला ज्याला राष्ट्राचा गाडा पुढें ढकलावयाचा आहे, ज्याला ज्याला आपल्या देशाला सौख्य व शक्य असेल तितकें स्वातंत्र्य मिळविण्याची इच्छा आहे, त्या त्या मनुष्याचा राष्ट्रीय संस्थेंत समावेश झाला पाहिजे. एकाचें साध्य कमी उच्च, कमी उदात्त असेल, दुसऱ्याचें उदात्ततर असेल, तिसऱ्याचें उदात्ततम असेल, पण राष्ट्रहित हा सर्वांचा हेतु असल्यामुळें राष्ट्रीय संस्थेंत सर्वांचा समावेश झाला पाहिजे. एका पक्षानें दुसऱ्या पक्षाला बहुमताच्या जोरावर खुशाल पराभूत करावें व आपलें वर्चस्व स्थापावें. दुसऱ्या पक्षाच्या अंगांत धमक असेल, तर तो जिवंत राहील व झगडेल. परंतु यादृच्छिक स्थानिक बहुमताचा फायदा घेऊन दुसऱ्या पक्षास संस्थेंतून हांकून

वर कां लादलें जावें ? आमच्या राजकीय चळवळीचा अंतिम हेतु सर्वांचा सार-
खाच असेल असें नाहीं. एक पुढें असेल, दुसरा मागें असेल. यंदांच्या कान्स्टिटयू-
शनच्या ठरावामध्यें राष्ट्रीय पक्षाला संमत नाहीं अशा प्रकारचें ' अंतिम साध्य '
त्यांच्यावर लादलें जाणार होतें कीं नाहीं ? अशा प्रकारच्या आपणाला असंमत
असलेल्या खोट्या राष्ट्रीय धर्मांच्या तत्वाच्या कागदावर राष्ट्रीय पक्षाच्या सभासदांना
सह्या करावयास लावणें ह्मणजे त्यांच्या मतांची थट्टा करणें होय. आपली 'अंतिम
साध्या ' संबंधाची कल्पना लोकांवर लादण्याचा व ते लादून घेतील तर त्यांची
राष्ट्रीय सभेंतून हाकालपट्टी करण्याचा कोणास हक्क आहे? ' अध्यांमुध्यां स्वराज्याचें
व मंदमंद सुधारणांचें' अंतिम राष्ट्रांतील एका विविक्षित पक्षास मान्य नाहीं ही गोष्ट
ना० गोखल्यांस माहित होती. तरी कास्टिटयूशनचा जो मसुदा त्यांनीं तयार केला
होता, त्यांत एका विविक्षित पक्षाचें अंतिम साध्य दुसऱ्यावर दडपून त्यांची कांग्रेसमधून
हाकालपट्टी करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. अमुक एक अंतिम साध्य तुम्ही कबूल
करा नाहीं तर ह्या सभेंत तुम्हांस थारा नाहीं, तुह्मी चालते व्हा, हा ना० गो-
खल्यांच्या नव्या नियमांचा अर्थ होता. कांग्रेस मोडण्याचा आमचा इरादाच होता,
असें जे ह्मणतात त्यांस मी असें विचारतों कीं, भिन्नभिन्न मताच्या सर्व लोकांचा
समावेश राष्ट्रीय सभेंत व्हावयास नको काय ? असें असतां गोखल्यापेक्षां भिन्न
अंतिम साध्य ज्यांचें आहे—पण जें राष्ट्रहिताच्याच मार्गांतलें आहे, त्यांस राष्ट्रीय
सभेंतून हांकून लावण्याचा आमच्या प्रतिपक्षाचा इरादा होता कीं नाहीं ? सर्व-
मान्य होतील ।किंवा निदान बहुमान्य होतील तेच ठराव राष्ट्रीयसभेंत पास होतील.
पण एखाद्या पक्षाचीं व आपलीं मतें जुळत नाहींत ह्मणून त्यास गचांडी देण्याचा
प्रयत्न कोणींही करितां कामा नये. असा प्रयत्न राष्ट्रीय पक्षानें केला काय ? आ-
पल्यापेक्षां भिन्न मत धारण करणाऱ्याविषयीं असहिष्णु कोण होते ? राष्ट्रीय
सभेंत दुसऱ्या पक्षाचें अस्तित्व मवाळांस असह्य झालें होतें कीं जहाळांस ? प्र-
तिपक्षास हांकून लावण्याची ही युक्ति नेमस्तांनींच केली होती—राष्ट्रीय पक्षानें
केली नाहीं. असें असतां राष्ट्रीयसभा राष्ट्रीय पक्षानें मोडली काय ?



तिसरा महत्वाचा प्रश्न म्हणजे कांग्रेसच्या पीछेहाटीसंबंधाचा होय. कांग्रेसचा करारीपणा, बाणेदारपणा व स्वावलंबनपणा वाढून कांग्रेसचें पाऊल पुढें पडावें, ह्या हेतूनें आम्ही सर्व नॅशनालिस्ट सुरतेस गेलों. आमचे बंगाली राष्ट्रानें निरुपाय होऊन ज्या खडतर निश्चयाचा-ज्या कडकडीत व्रताचा अंगीकार केला त्या व्रताचा प्रसार इतर प्रांतांत व्हावा, इतर प्रांतांनीं आम्हांस आमच्या राष्ट्रीय झगड्यांत मदत करावी अशी आमची इच्छा होती व आहे. आम्ही हा जो शांतपणाचा—पण निश्चयाचा झगडा मांडला आहे, त्यांत आम्हांस इतर प्रांतांचें सक्रिय साहाय्य मिळावें, अशी आमची महत्वाकांक्षा होती.पण स्वा० कमिटीच्या नांवानें यंदांच्या ठरावांचे जे विषय प्रसिद्ध करण्यांत आले, ज्या विषयांसाठीं आम्हीं कलकत्ता कांग्रेसमध्यें इतक्या निकारानें झगडलों, त्यांपैकीं एक खेरीज करून बाकीचे सर्व विषय गाळलेले होते ! तेव्हां कांग्रेस पुढें सरकावयाची गोष्ट दूरच राहिली. पण निदान ती आहे तेथें तरी राहते कीं नाहीं, ह्याची आम्हांस चिंता पडली ! विषय अगदींच गाळले होते आणि राष्ट्रीय पक्षाचा अडथळा दिसतांच ते छिन्न भिन्न—पुळपुळित करून मागाहून घालण्यांत आले, किंवा पूर्वीच छिन्नभिन्न विषय घालून नावें तेवढीं दडपून टाकण्यांत आलीं होतीं, हें सांगतां येत नाहीं. परंतु सुरतेस जी विषयांची यादी-मुंबईस ती २५ तारखेस पाठविली गेली असतां-आम्हांस तारीख २६ रोजीं कांग्रेस सुरू झाल्यावर मिळाली, त्या यादींत थोडे पांगळे आणि बुळे बनविलेले विषय आम्हांस आढळले. ना. गोखले म्हणतात कीं, गुदस्तांच्या ठरावांत आपण केलेले फेरफार केवळ शाब्दिक-क्षुल्लक असून ते अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ आणि भाषासौष्ठवासाठीं करण्यांत आले होते ! ना. गोखल्यांसारख्यानें असें विधान करावें हें विचित्र होय ! स्वराज्याचा ठराव गुदस्तां कलकत्यास पास झाला त्यांत 'वसाहतींतील स्वराज्य' हें अंतिम स्पष्टपणें ठरलें असतां यंदांच्या नियमांत ना. गोखल्यांनीं Creed Resolution घालून तें कसें संदिग्ध व मिळमिळित केलें होतें, हें मीं आपणास सांगितलेंच आहे. स्वदेशीचा ठरावही तसाच छाटाछाट करून पुढें आणलेला आढळला. गुदस्तां 'Even at some sacrifice'—'झीज सोसूनही' हे शब्द घालण्यासाठीं नॅशनालिस्ट पक्षास केवढी खटपट करावी लागली होती! हे शब्द घालून गुदस्तां दोन्ही पक्षांचा समेट ठरला. हे शब्द दोन्ही पक्षांना मान्य

झाले होते. गोखले म्हणतात हे शब्द नजरचुकीनें राहिले ! ' Even at some sacrifice ' हे शब्द चुकून किंवा विस्मृतीनें ठरावांतून गळतील—आणि तेही गोखल्यांच्या हातून—ही गोष्ट आम्हांस ह्या शब्दाच्या प्राचीन इतिहासाशीं सुसंगत दिसेना. गतवर्षी स्वदेशीच्या ठरावावर मतभेद झाला त्यावेळीं समेट करण्याकरितां जे उभय पक्षाचे लोक जमले होते, त्यावेळीं हजर असण्याची संधि मला मिळाली होती. आमच्या पक्षाच्या बाजूनें रा० टिळक, अश्विनी बाबू आणि मी असे तिघेजण हजर होतों. विरुद्ध पक्षाच्या बाजूनें ना० गोखले व पंडित मदनमोहन हे हजर होते. आम्हां पांच जणांत वादविवाद होऊन ' झीज सोसून देखील ' हे शब्द ठरावांत घालण्याचा समेट ठरला होता. तेव्हां हडसून खडसून घातलेले शब्द नजर चुकीनें गळले, असें आम्हांस वाटलें नाहीं. दुसऱ्या ठरावांत केलेले अन्वर्थक फेरफार पाहतां, वरील शब्द मुद्दाम गाळले, असें अनुमान केल्यास ना० गोखल्यांचा आम्हीं अन्याय केला, असें होतें काय ? आम्हांला काय ठाऊक कीं ना० गोखल्यांना—एका जनरल सेक्रेटरीला—गुदस्तांचे ठराव बरोबर रीतीनें छापलेल्या कोणत्याही वर्तमानपत्राची फाईल सांपडली नाहीं म्हणून ? आतां सांगितलेल्या पांच जणांच्या कमिटींत वरील शब्द घातले गेले असतां, ते शब्द गोखले विसरले असतील, असें आम्हांस वाटलें नाहीं, ही गोष्ट खरी आहे ।

बहिष्काराच्या ठरावांत तर धडधडीत अर्थाची हानि होईल, व बंगालनें उचललेलें बहिष्कार शस्त्र फक्त विलायती मालासंबंधानेंच आहे असें दिसेल, अशा बेताची फिरवाफिरव गोखले यांनीं केली होती. Boycott movement inaugurated in Bengal ह्यांत Boycott of British goods resorted to in Bengal ह्यापेक्षां जास्त खास आहे. movement म्हणजे हालचाल हा अर्थ घेऊन ही बहिष्काराची चळवळ एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूकडे—एका गांवांतून दुसऱ्या गांवांकडे—एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांताकडे प्रवास करील, अशी आशा गुदस्तां बिपिनबाबूंनीं कांग्रेसमध्यें व्यक्त केली. गोखल्यांना हा अर्थ फिरवून तो ठराव कुला करावयाचा नव्हता काय ? बंगाल्यांतील चळवळीकडे जो वरवर पाहील त्यास देखील बंगालची चळवळ ही फक्त ' ब्रिटिश मालापुरतीच नव्हती असें दिसून, सरकारानें फाळणी झाली म्हणून डांगोरा

पिटला, तर आह्मीं ही फाळणी आह्मांस कबूल नाहीं !' असें सरकारास बजाविलें आह्मांस फाळणी कबूल नाहीं, हें दर्शविणारा सर्व प्रकारचा बहिष्कार—निव्वळ औद्योगिक बहिष्कार नव्हे-आह्मीं अंगीकृत केला. आमचा बहिष्कार ह्मणजे अड-वणुकीचा मार्ग होता, हें सर्व हिंदुस्थानास माहीत आहे. नुसत्या विलायती मा-लावरच बहिष्कार असता, तर स्वाभिमानी व बाणेदार बंगाली गृहस्थांनीं आप-ल्या कौन्सिलांतील जागेचा राजीनामा कां दिला असतां ? बंगालचा बहिष्कार नुसता मालापुरता औद्योगिक बहिष्कार असता, तर सरकारी शाळांना बहिष्कार घालण्याचें काय कारण होतें ? विलायती मालावर बंगालनें बहिष्कार घातला होता, हीही गोष्ट खरी. पण तो बहिष्कार दुसऱ्या एका सर्वव्यापी बहिष्काराचें एक उपांग होतें. येथें एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, 'परकी माला' वर घालावयाचा बहिष्कार हा फक्त 'औद्योगिक' आहे.परंतु फक्त इंग्रजी माला-वर घालावयाचा बहिष्कार हा राजकीय स्वरूपाचा आहे. ह्या राजकीय शस्त्रांचा उपयोग ब्रिटनशिवाय इतर देशांच्या विरुद्ध करण्याची आपणांस जरूरी नाहीं. ब्रिटनच्या लोकांनीं आपणावर जुलूम केला, ह्मणून जर्मनी किंवा अमेरिका ह्यांवा सूड काय ह्मणून उगवावा ? जर्मनी किंवा अमेरिका यांचा माल आपण घेत नाहीं किंवा घेणार नाहीं, तो हिंदुस्थानांतील उद्योगधंदे वाढावे ह्मणून होय. पण ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्यांत ह्याशिवाय दुसराही राजकीय हेतु आहे; तो हा कीं, आपणावर जुलूम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या जातभाईंस चट्टा बसेल असें करणें हा होय. बंगालचा बहिष्कार हा दुसऱ्या प्रकारचा होता, तरी त्याचें क्षेत्र—त्याची मर्यादा फार विस्तृत आहे. सरकारला अन्यायानें व अनियंत्रित स-त्तेनें चालविलेल्या राज्यकारभारांत कोणत्याही प्रकारें आपण साह्य न करणें, हा आमच्या बहिष्काराचा अर्थ होता. हा इतका उघड आहे कीं, तो कोणाही डो-ळस मनुष्यास दिसण्यासारखा आहे. ना. गोखले ह्यांना आह्मीं बंगाली लोकांनीं अशा प्रकारचाच बहिष्कार सुरू केला आहे, ही गोष्ट माहीत होती. पण त्यांनीं जाणून बुजून बंगालचा बहिष्कार फक्त विलायती मालापुरताच आहे, असें भास-विण्याचा प्रयत्न केला किंवा सुरतची कांग्रेस तरी फक्त निदान तेवढ्यापुरतीच बंगालचा बहिष्कार मान्य करते, असें स्पष्ट करण्याचा नामदारांचा हेतु असेल ! गतवर्षींच्या ठरावांत केलेली लवबड आह्मां बंगाली राष्ट्रपक्षीयांच्या दृष्टीनें तरी

पीछेहाटीची व फार महत्वाची होती. असें असतां गोखले ह्मणतात कीं, फिरवाफिरव फक्त शाब्दिक आणि क्षुल्लक होती ! गोखल्यांना ही फिरवाफिरव कितीही क्षुल्लक व शाब्दिक वाटली, तरी बंगाली नॅशनालिस्ट पक्षास ती तशी वाटणें अशक्य आहे. आह्मी बंगाल्यांतील–विशेषतः पूर्व बंगाल्यांतील लोकांनीं ज्या सर्वव्यापी बहिष्काराच्या प्रसारार्थ एवढे हाल सोसले, मुलांनीं फटके खाल्ले, अनेकांनीं तुरुंगांत आपले देह कष्टविले, किल्येकांनीं आपल्या सर्वत्रावर पाणी सोडलें–ह्या बहिष्काराचें हें नामदार गोखल्यांनीं बनाविलेलें रोडकें चित्र आह्मांस बिलकूल पसंत पडलें नाहीं. आमच्या बहिष्कारास नुसतें औद्योगिक स्वरूप देण्याचा नामदारांचा बेत आह्मांस मुळींच कबूल नव्हता. इतर प्रांतांची आह्मांस खरीखुरी सहानुभूति मिळावी ह्मणून आह्मी नेटानें झगडलों, नेटानें हाल सोसले आणि ह्या अडवणुकीच्या मार्गास राष्ट्रीय सभेचें पाठबळ गतवर्षी मिळालें; तें काढून ठराव बोंथट करण्याचा गोखल्यांचा उघड उघड प्रयत्न असतां, ते ह्मणतात कीं फेरफार काय ते शाद्बिकच होते !

राष्ट्रीय शिक्षणाचे ठरावांतील On National lines and under National Control हे महत्वाचे शब्द गाळून त्या ठिकाणीं Independent system हे शब्द घातले. गोखले ह्मणतात कीं, ' नॅशनल नॅशनल नॅशनल, असें ठरावांत तीनदां येत होतें ह्यामुळें ठरावाची भाषा बिघडली होती, ती फिरवून आपण दुरुस्त केली ! गोखले इंग्रजी भाषेचे पंडित आहेत, परंतु नॅशनल शद्बाची त्रिरुक्ति करण्यांत आह्मांस तरी विशिष्ट हेतु दिसतो. स्वतंत्र पद्धतीचें राष्ट्रीय शिक्षण ह्मणजे ग्रँट घेतलेल्या निमसरकारी शाळेंतील किंवा कॉलेजांतील शिक्षण होऊं शकेल. परंतु ' राष्ट्रीय पद्धतीवर ' व ' राष्ट्रीय हुकमतीखालीं ' हे शद्बसमूह गोखल्यांना ' अजागळ ' व निरर्थक वाटले ह्मणून वाईट इंग्रजी वाक्य चांगल्या इंग्रजींत आणण्यासाठीं–भाषासौष्ठवासाठीं–त्यांनीं फेरबदल केला ! ह्या फेरबदलामुळें ह्या शाब्दिक क्षुल्लक–भाषासौष्ठवाच्या घोंटाळ्यामुळें सबंध राष्ट्रीय पक्ष नाखुष होईल व झाला हें माहीत असतां एवढें ' वाईट इंग्रजी वाक्यच ' त्यांनीं राहूं दिलें असतें, तर त्यांत त्यांच्या इंग्रजी ज्ञानास थोडाबहुत कमीपणा येण्यापेक्षां दुसरी कांहीं फारशी हानि खास झाली नसती ! इंग्रजी भाषा शुद्ध व गोंडस लिहितां यावी हा कांहीं कांग्रेसचा हेतु नव्हे ! थोडीशी खराब भाषा

ठेवण्यानें जर सर्वांचें समाधान होत होतें, तर तेवढी कमतरता राहूं दिल्यानें काय नुकसान होणार होतें ! परंतु ना. गोखले यांनीं इतक्या महत्वाचा फेरबदल केला असतांही तो सर्वांनीं शाब्दिकच समजावा, असें ह्मणणें ह्मणजे राष्ट्रीय पक्ष अडाणी व मंदबुद्धि आहे असें समजण्याप्रमाणेंच आहे.

अशा प्रकारें कांग्रेस मोडण्याचा आमचा संकल्पच होता असें ह्मणणारांपुढें हे तीन प्रश्न आहेत. सभासदांचा भाषणस्वातंत्र्याचा हक्क बुडविण्याचा बेशिस्तवार प्रयत्न कोणीं केला ?–राष्ट्रीयपक्षानें ? कांग्रेसमधून एका विविक्षित मताच्या लोकांना वेगळण्याचा–हांकून बाहेर पाडण्याचा–निंद्य प्रयत्न कान्स्टिटयूशनचे पक्षपाती नियम करून कोणीं केला ? राष्ट्रीय पक्षानें ? सर्वानुमतें पास झालेला ठराव बदलून टाकून स्थानिक बहुमताच्या जोरावर कांग्रेसची पीछेहाट करण्याचा बेत कोणाचा होता ? नॅशनालिस्टांचा ? ह्या महत्वाच्या गोष्टी आहेत. यंदांचें भांडण कांग्रेसमधील अनियंत्रित सत्ता व साधारण लोक यांच्यामध्यें होतें. तें एक प्रकारचें तत्वाचें भांडण होतें.

जी कांग्रेस सरकारच्या अरेरावीच्या विरुद्ध ठराव पास करते तिच्यांतीलच कांहीं लोकांनीं अरेरावी चालविल्यास कसें पचेल ? कांग्रेसमध्यें घोंटाळा झाला, तर तो यंदांच्या विशिष्ट परिस्थितीमुळें झाला. त्यांत टिळकांचा दोष नाहीं; राष्ट्रीय पक्षाचा दोष नाहीं. पुढें एकोपा होईल किंवा नाहीं–व होणें शक्य आहे कीं नाहीं–हें कालांतरानेंच ठरणार आहे. तथापि आमच्या राष्ट्रीय पक्षास भविष्यकाळांत फार मोठें कार्य करावयाचें आहे. वाटेंत अडचणींचे डोंगर आहेत, पर्वतप्राय संकटें आहेत. हाल अपेष्टा सोसाव्या लागतील, कष्ट करावे लागतील, सर्वस्वाची आहुति द्यावी लागेल; कित्येकांना देह खर्च करावे लागतील, तेव्हां कोठें आपलें अंतिम व उदात्त ध्येय, सर्व सौख्यांची परिपूर्णता, सर्व साध्यांतील साध्य, सर्व लोकांचें अभीष्ट जें स्वराज्य तें आपणांस मिळेल. भविष्य काळांत जें आपणांस काम करावयाचें आहे, त्यासंबंधें उद्यां बोलेन. ”

व्याख्यान सहावें.

## भविष्यकाळांतील काम.

माझे देशबांधवहो, ज्यांनीं डोळे नीट उघडे ठेऊन गेल्या दोन वर्षांपूर्वी सुरू झा-

लेल्या चळवळीकडे बारकाईनें पाहिलें असेल,त्या चळवळींत-त्या विचार क्रान्तींत-त्या आचारांच्या अस्मानी सुलतानींत केवढा जोम आहे, हें ज्यांच्या लक्षांत आलें असेल, त्यांची ह्या चळवळीच्या पाठीमागें कांहीं तरी अदृश्य,अद्भुत, दिव्य, ईश्वरी शक्तीचें पाठबळ आहे, ह्याबद्दल खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. ही चळवळ कांहीं सामान्य चळवळ नव्हे, ह्या चळवळीचा नियामक आणि नायक कोणी मनुष्य प्राणी खास नव्हे, ह्या चळवळीला जगांतील श्रेष्ठतम सामर्थ्याचा आधार आहे, जगांतील सर्व क्रांत्या ह्या विलक्षण शक्तीनेंच घडवून आणलेल्या आहेत. कांहीं तरी अलौकिक-अमानुष शक्ति राष्ट्रांत स्फुरण पावूं लागली आहे. ज्यालोकांनीं-मुठभर वेड्या लोकांनीं-ही चळवळ सुरू केली ते लोक अप्रसिद्ध होते. ही चळवळ महाप्रसिद्ध कसलेल्या पुढाऱ्यांनीं सुरू केलेली नव्हे. परंतु आतां पुढाऱ्यांना ह्या ओघांत मिसळावें लागलें. अप्रसिद्ध लोकांनीं सुरू केलेल्या या चळवळीच्या प्रवाहांत मोठमोठे पुढारी वहात चालले आहेत ! अशी या प्रवाहांत अनिरुद्ध शक्ति आहे. ह्या चळवळीमुळें शेंकडों वर्षांत न होणारी लोकजागृति दोन वर्षांत घडवून आणली आहे. चळवळींत पडलेले लोक मोठे विद्वान होते असें नाहीं. ते इतर माणसांप्रमाणें सामान्य मनुष्य होते. त्यांच्या हातून अनेक प्रमाद झाले, अनेक चुका झाल्या; परंतु आश्चर्य हें कीं या चुकीमुळें चळवळीचा पाय मागें न हटतां अप्रतिहतपणें पुढेंच चालला आहे. किंबहुना ह्या चळवळीचें संपूर्ण सामर्थ्य आपणा क्षुद्र मानवांच्या विचारशक्तीस गोचर होण्यासारखें नाहीं. ह्या चळवळीच्या लाटेच्या शिरोभागावर आरूढ होऊन कांहीं समान्य लोक---आपल्या उज्वल राष्ट्रभक्तीनें व कळकळीनें, आपल्या अद्वितीय स्वार्थत्यागानें व कर्तव्यनिष्ठेनें-उच्चपदास पोंचले आहेत---सर्व राष्ट्रास वंदनीय झाले आहेत ! आमच्या प्रतिपक्षाचा भडकलेला राग, आपसांतील भांडणें, चुगलखोरांच्या चुगल्या आणि घरबुडव्या घरभेद्यांचा विश्वासघात-मात्रागमनीपणा-ह्यांच्या योगानें ह्या चळवळीचा ओघ थांबला नाहीं, तिचा वेग कमी झाला नाहीं. ही चळवळ एखाद्या प्रचंड नदीच्या लोंढ्याप्रमाणें जें जें तिच्या सपाट्यांत सांपडेल त्याला पुढें ढकलीत चालली आहे. आजपर्यंत पृथ्वीवरील अनेक राष्ट्रांत विलक्षण धर्मक्रांत्या झाल्या आहेत. तशाच प्रकारची ही एक क्रांति आहे. ही क्रांति राजकीय वातावरणांत चालली आहे. हा राष्ट्राच्या राजकीय उन्नतीचा आरंभ आ

ह्या प्रवाहाच्या लोंढयावर बसून हिंदी समाज हा निमित्त मात्र होत्साता ईश्वरी इच्छेचें अनुपालन ईश्वरी आज्ञेचें परिपूरण निसर्गत: करीत आहे. समाजाच्या पोटांत सुरू झालेली ही खळबळ कांहीं तरी दैवी कार्य घडवून आणणार यांत शंका नाहीं. ही चळवळ मानवी इच्छेनें खास चाललेली नाहीं. आम्ही सुरतेस एका विशिष्ट हेतूनें गेलें.आम्ही आमच्या मतांची व आमच्या तत्वांची प्रगति व्हावी म्हणून कांग्रेसला गेलों; परंतु तेथें निराळाच प्रकार घडून आला ? आमचे प्रतिपक्षीही आपल्या बाजूचा वर्चष्मा करण्यासाठींच तेथें जमले पण त्यांचाही तसाच मनोभंग झाला ! ही आकस्मिक फाटाफूट कदाचित ईश्वरी संकेतानें--राष्ट्राच्या कल्याणासाठींच घडून आली नसेल--असें तरी कसें म्हणावें ? परमेश्वराचे हेतु अतर्क्य असतात; त्याची लीला अगम्य आहे. ऐक्य अवश्य आहे, ऐक्य पाहिजे. परंतु ह्या दुहीनेंच राष्ट्राचा उद्धार करण्याचा ईश्वरी संकेत असेल काय ? असेलही; कोणीं नाहीं ह्मणावें ! उभय पक्षांचा समेट व्हावा; अशी सर्वांची इच्छा आहे. पण पुढें काय होणार हें कोणीं सांगावें ? परंतु राष्ट्रीय पक्षाला ह्यापुढें जें काम करावयाचें तें मात्र फार भयंकर आहे. आपल्या पक्षाच्या सामर्थ्याची आणि चिवटपणाची आज परीक्षा होणार आहे. आतां आपल्या पक्षाचें सत्व कसोटीस लागणार आहे. ह्यासाठीं आपण काय कार्य हातीं घेतलें आहे; आम्हांला कोठें जावयाचें आहे; वाटेंत केवढे खड्डे आणि विघ्नें आहेत; आपल्या ठायीं किती ताकद आहे, आपल्या ठिकाणीं किती दौर्बल्य आहे, कोणत्या मार्गानें आपणांस गेलें पाहिजे ह्या सर्व गोष्टींचा अंदाज आतां आपणांस केला पाहिजे. इतके दिवसाचें आपसांतील भांडण हा फक्त बौद्धिक वादविवाद होता. राष्ट्राच्या अंगांत चेतना ओतावयास त्याची जरुरी होती---आजपर्यंत आपली ताकदही थोडी होती व ती ह्या वादविवादांत खर्च होत होती. आपल्या राष्ट्राच्या अंगांत असलेल्या शक्तीचा नीट अंदाज कोणास झाला नाहीं. ह्या शक्तीचें एकीकरण करण्याचा कोणीं यत्न केला नाहीं, पुष्कळांना ह्या शक्तीचा विश्वास अद्याप वाटत नाहीं, पुष्कळांची खात्री पटत नाहीं, पुष्कळ असामी इकडें तिकडे घोंटाळत आहेत, असा प्रकार असल्यामुळें आज दोन पक्ष झाले आहेत. आमच्या पक्षाच्या एकट्याच्याच हातून कार्य घडवून आणावयाचें असा तर संकेत नसेल ! आमच्या सामर्थ्याचा अंत पाहण्याची तर ईश्वरी इच्छा

नसेल !—हल्लींचा काळ मंद मंद प्रगतीचा नव्हे.हा अत्यंत शीघ्र अतिशय सपाट्या-च्या प्रगमनाचा काळ आहे. प्रत्येकानें ह्यावेळीं पुढें घुसलें पाहिजे. धैर्य पाहिजे, साहस पाहिजे,धीटपणा पाहिजे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळच्या एका लेखकानें ह्मटलें आहे " घाबरून टाकण्यासारखें कांहीं नाहीं. निष्ठा ठेऊन पुढें धांवा—चला, पळा, सरका ! " जपान व जर्मनी येथेंही अशीच शीघ्र प्रगति झाली. कदाचित आपलें ऐक्य घडवून आणण्याचे प्रयत्न निष्फळही होतील ! तेव्हां काय मिळवावयाचें याचा निर्णय आपणास ठरविला पाहिजे. कांग्रेसचे जुने भक्त नेमस्त लोक यांचा मार्ग भिन्न होता. त्यांना हल्लींची राज्यव्यवस्था सर्वस्वी बदलून टाका-वयाची नव्हती. त्यांना क्रांति करावयाची नव्हती. त्यांना आहे यांतच सुधारणा करावयाची होती. त्याला धैर्याची जरूरच नव्हती. पण त्या मार्गानें कार्यही घडून आलें नाहीं. हक्क मिळणें शक्य नाहीं. नुसतें सुराज्य स्वराज्याची तहान भागवूं शकत नाहीं. आपली राष्ट्रीय जबाबदारी—राष्ट्रीय कर्तव्यें जर आपण परक्यांवर लोटूं लागलों तर तो केवळ राष्ट्रीय मृत्यु होय, ती महाविपत्ति होय.आपलें सौख्य आपला सुरक्षितपणा ज्यांना पाहिजे असेल, त्यानें आमच्या मार्गांत पाऊल ठेऊं नये. अंगचोरांची आह्मांस जरूर नाहीं. परक्यांच्या कृपेनें त्यांचे जवळूनच तुह्मी कसें राज्य मिळवाल ! तुमचें त्यांचें हिताहित भिन्न भिन्न आहे. ज्यांना द्यावयाचें त्यांनीं हळूहळूच कां द्यावें ? सरकार हळूहळू सुद्धां स्वराज्याचे खरे हक्क आपणास देणार नाहीं. थोडें दिलें तर जास्त मागतील ही भीति त्यांना आहेच. सरकारला हक्क द्यावयास पाडूं असें ह्मणणें ह्मणजे पूर्ण स्वराज्य मिळविण्याची महत्वाकांक्षा धरण्याइतकेंच धोक्याचें आहे. स्वराज्याचे हक्क मि-ळविण्यासाठीं जगांतील प्रत्येक राष्ट्रानें जे उपाय योजले तेच उपाय परिस्थितीला अनुसरून आपणासही योजले पाहिजेत. वसाहतींचें स्वराज्य हें अंतिम साध्य अर्धवट व अस्पष्ट आहे. त्यामुळें चळवळीचा परिणामही अर्धवट व अस्पष्ट असाच होतो. अन्तिम साध्य श्रेष्ठतम असेल, उदात्त असेल, स्फूर्तिजनक असेल तरच कार्यकर्त्या लोकांना आवेश येतो, स्फूर्ति उत्पन्न होते. ह्मणून अत्यंत उच्च असेंच ध्येय आपणांपुढें ठेविलें पाहिजे. ह्या ध्येयाकडे—पूर्ण स्वराज्याकडे आपणाला प्रवास करावयाचा आहे. वारंवार आपणास असें हिणविण्यांत येतें कीं, स्वतंत्र स्वराज्याची उडी ह्मणजे नुसतें स्वप्न आहे, नुसतें मनोराज्य आहे

कारण आपला समाज दुर्बळ निःसत्व विसकळीत खिळखिळा झालेला आहे. आपल्या समाजांत असलें महत्कार्य संपादण्यास लागणारें धैर्य कोठें आहे ? सामर्थ्य कोठें आहे आणि स्वार्थत्याग व आधिभौतिक साधनें तरी कोठें आहेत ? स्वराज्य संपादण्याचें काम मानवी शक्तीच्या बाहेरचें आहे ह्मणून कांहीं शतकें थांबा, कांहीं दिवस काम करा, आणि मग स्वराज्याच्या गोष्टी बोला. असा कित्येकांचा उपदेश आहे. परंतु परकीयः अंमलाला साहाय्य करून कोणतेंच राष्ट्र उदयास आलें नाहीं. स्वतंत्रतेचे धडे स्वतंत्रतेच्या शाळेंतच शिकले पाहिजेत. यापुढें कांहीं शतकें थांबल्यास आपल्या राष्ट्राची दुर्बलता मात्र वाढेल; आतां थांबण्याची सोयच नाहीं. मिळवावयाचें असेल तर आतांच प्रयत्नाला लागा नाहीं तर स्वराज्याचें नांव कायमचें सोडून द्या.

हिंदुस्थानांतील सध्यांची चळवळ ही बंगाल्यांत एकाएकीं उदयास आली. ह्या चळवळीनें बंगालचें सर्व स्वरूप पालटून टाकिलें आहे. प्रत्येक अंतःकरणांत परमेश्वरी प्रेरणेनें स्फूर्ति उत्पन्न झाली आहे. ही ईश्वरी योजनाच असली पाहिजे. एरवीं थोड्याशा अप्रसिद्ध लोकांच्या चळवळीनें दोन वर्षांत अमानुष कार्ये कसें घडून येतें ? आपण कदाचित बंगालच्या चळवळीचें लक्षपूर्वक निरीक्षण केलें नसेल. बंगालची चळवळ ही थोड्याशा लोकांनीं प्रथम सुरू केली. ह्या प्रवर्तकांना लोक वेडेपीर समजत. पण ह्या वेड्या पीरानींच स्वदेशीचा प्रचार वाढविला, बहिष्काराचा उपदेश केला, आखाडे स्थापन केले. त्यामुळें चळवळीचा डोंबाळा चोहोंकडे पसरला, सर्व तरुण पिढी चळवळीला साह्य झाली. सगळें बंगाल सजीवन झालें. बंगाल कान वर करून ऐकूं लागलें. पुढाऱ्यांचा बहिष्कारावर भरंवसा नव्हता. तथापि त्यांना लोकमताच्या जोरापुढें टिकाव धरवेना. बहिष्काराचे चळवळींत तो सामील झाले. सरकारी अधिकारी घाबरून गेले. चळवळीचीं हाडें घुसळण्यासाठीं त्यांनीं दडपशाहीच्या धोरणास सुरवात केली. पहिल्यानें गदा विद्यार्थ्यांवर आली. स्वदेशी मालाचा प्रसार होण्यास कसून मेहनत विद्यार्थ्यांनींच केली होती. विद्यार्थ्यांस दंड होऊं लागले, शिक्षा होऊं लागली, त्यांची शाळेंतून हाकालपट्टी होऊं लागली परंतु त्यांना स्वदेशी व्रत सोडावयाचें नसल्यामुळें त्यांनीं शाळा सोडल्या. त्यामुळें राष्ट्रीय शाळा काढाव्या लागल्या. रंगपूर, डाका इत्यादि ठिकाणीं भराभर

राष्ट्रीय शाळा उघडल्या. बंगालचें **राष्ट्रीय शिक्षण मंडळ** प्रस्थापित झालें, जरूरी उत्पन्न होतांच कांहीं साधनें उपलब्ध नसतांही शाळा निघाल्या. फंड नाहीं; शाळागृह नाहीं; सामानसुमान नाहीं. पण बंगाली राष्ट्राच्या सहानुभूतीमुळें आज सर्व संस्था उत्तमप्रकारें चालूं लागल्या आहेत. मुलें 'स्वदेशी' करितां मार खात आहेत, तुरुंगांत जात आहेत, फटके सोशीत आहेत, हाल अपेष्टा भोगीत आहेत. आजपर्यंत बंगाली राष्ट्र ह्मणजे नेभळें अशी सर्वांची समजूत होती. एका इंग्रज गृहस्थाचें असें मत आहे कीं—वाङ्मयाच्या अभ्यासांत बंगाली लोक मोठे हुशार आहेत, त्यांपैकीं एकएकटा घेतला, तर तो फार कर्तृत्ववान व बुद्धिवान् आहे. पण राष्ट्र या दृष्टीनें पाहतां बंगाली लोकांत कांहीं जीव नाहीं. बंगाल्यांच्या हातून मातीसुद्धां होणार नाहीं!पण स्वदेशी चळवळीपासून ही सगळी स्थिति बदलली आहे. उक्ति आणि कृति ह्यांमधील अंतर नाहींसें झालें आहे. सर्व राष्ट्रभक्त—जणूं काय एक पुरुष आहे, अशा प्रकारें एकाच विचारानें हालत आहेत. आमच्या तरुण पिढीला प्राणांची फिकीर वाटेनाशी झाली आहे. मौलवी लियाखत ह्यांचें कांहीं एकच उदाहरण नाहीं. अशीं उदाहरणें अनेक आहेत. मौलवी लियाखत ह्यांना धड बंगाली भाषाही येत नाहीं. पण त्या धीरोदात्त पुरुषानें जी मेहनत केली, जो स्वार्थत्याग दाखविला, तो अवर्णनीय होय! त्याच्यावर आज ३ खटले लोंबकळत आहेत. परवांची ३ वर्षांची शिक्षा त्यानें हांसतमुखानें स्वीकारली, इतकेंच नव्हे तर स्वदेशासाठीं आपणास देह कष्टविण्याची संधि दिल्याबद्दल त्यानें मॅजिस्ट्रेटचे आभार मानिले ! आणि कदाचित पुन्हां जगांत परत न येण्यासाठीं मौलवी साहेब तुरुंगांत गेले आहेत! युगांतर वर्तमानपत्राची गोष्ट तर फारच विलक्षण आहे. एका एडिटरास १ वर्षाची सक्त मजुरीची शिक्षा झाली तों दुसरा आला. त्याच्यावरही खटला होऊन त्यास शिक्षा होते न होते तोंच तिसरा पुढें आला; व मॅजिस्ट्रेट बजावीत असतांही मोठ्या खुषीनें त्यानें संपादकत्व आपल्या आंगावर घेतलें ! त्याच्या मागून चवथा आला. पण पत्र तसेंच चालू राहिलें आहे. एकाला शिक्षा झाली, तेव्हां त्याला काळजी पडली कीं, पत्र पुढें कसें चालणार?—त्याला बायकामुलांची आठवण पहिल्यानें झाली नाहीं! युगांतर पत्र अशा प्रकारें अजून सुरू आहे! अशा प्रकारें बंगाली लोक "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" ह्या बुद्धी

स्वार्थाचा व सर्वस्वाचा होम करीत आहेत. बंगालचा राष्ट्रीय पक्ष कचरला नाहीं. त्यानें कधीं कचर खाल्ली नाहीं. गॅरिबाल्डीच्या पूर्वी इटाली देश म्हणजे फक्त एका भूगोलांतलें नांव होतें. पण २० वर्षांत तें थोर राष्ट्र झालें. तसाच प्रकार बंगाल्यांत चालला आहे. बंगाली तरुणांच्या अंगचें दैवी तेज स्पष्टपणें बाहेर पडलें आहे. ईश्वरी अंश प्रकट झाला आहे. एकाला सरकारानें उचलावा, तोंच त्याच्या ठिकाणीं दुसरे १०० तयार होतात. मी आपलें सर्वस्व ३० कोटी लोकांच्या सुखासाठीं खर्चीन असें बंगाली राष्ट्रभक्तांस वाटूं लागलें आहे. **ही भावना सर्वत्र पसरली पाहिजे.** हिंदी राष्ट्राचें सुख तें माझें सुख; त्याचें दुःख तें माझें दुःख असें वाटलें पाहिजे. दुःख व यातना सोसण्यांत धन्यता वाटली पाहिजे. अशा यातना सोसणें म्हणजे राष्ट्राचें ऋण फेडणें होय.

**स्वार्थत्यागाशिवाय** राष्ट्रें उदयास येत नाहींत. राष्ट्राचें ऋण देण्यास कोणी भागुबाईपणानें माघार घेतां कामा नये. अंगचोरी, हातचलाखी, किंवा नाटकीपणा नको आहे. पोक्त सावधगिरीचे, जपूनजपून योजावयाचे, मोजके उपाय चालावयाचे नाहींत. **पुढें घुसलें पाहिजे.** राष्ट्राभिमान हाच आमचा धर्म, स्वार्थत्याग हेंच आमचें कर्म. आमच्यांतील दैवी गुणांचा विकास होण्यास पूर्ण अवकाश दिला पाहिजे. क्षुद्र विकार सोडले पाहिजेत. तुम्हांला ही ऋण देण्याची पाळी येईल, तर भिऊं नका, हटूं नका, राष्ट्राकरितां दुःख सहन करा. तुमच्या मागें परमेश्वर आहे. तसें तुम्ही कराल, तर हिंदी राष्ट्र ह्मांहां म्हणतांना आपलें प्राचीन वैभव व तेज संपादन करील. तें जगांतील स्वतंत्र राष्ट्रांचे पंक्तीला जाऊन बसेल; सगळ्या जगास शिक्षण देईल; सत्यज्ञानाचा प्रकाश दाखवील, वेदांताचे सिद्धांत सांगेल. सर्व जगाचें आणि मानव जातीचें कल्याण करण्यास आमचें राष्ट्र पुढें येईल. त्याच्या पुढें सारें जग थरथरां कांपेल ! पण केव्हां ? आपण सगळे राष्ट्राचें ऋण देण्यास तयार होऊं तेव्हां ! आपण माझा जो सत्कार केला त्याबल मी आपला अत्यंत आभारी आहें. हा सत्कार माझा नसून तुमची व माझी मातृभूमि हिचा हा माझ्या मध्यस्थीनें आपण सत्कार केला आहे. मी ज्या ज्या ठिकाणीं गेलों तेथील लोकांनीं जो विलक्षण उत्साह दाखविला त्यावरून राष्ट्रीय विचार लोकांच्या हृदयांत प्रदीप्त झाले आहेत असें स्पष्ट दिसत आहे. दोन वर्षांपूर्वी आपण कसे होतों, लोकांना कोणत्या गोष्टी आवडत होत्या व आज त्यांच्या

सवलती परकी व्यापाऱ्यांस दिल्या. आमच्या मारवाडी बंधूंना हें समजावयास पाहिजे होतें. त्यांनीं समजून किंवा अज्ञानयुक्त हट्टीपणानें देशाचें नुकसान केलें. व परमेश्वरानें—न्यायी परमेश्वरानें—त्यांना त्याबद्दल शासनही केलें. ' माझ्या लेकरांच्या हिताविरुद्ध वागणारांना दंड केल्याशिवाय त्यांना बोध होणार नाहीं ' असा विचार करून सर्वशक्तिमान परमेश्वरानें त्यांच्यावर प्रसंग आणला. मारवाडी लोक बहुधा जैन आहेत. पारसनाथाची टेंकडी सरकारनें स्वाधीन करून घेतली. व ज्या ठिकाणीं देवाची भक्ति करण्यास लोक धांवत त्या ठिकाणीं आतां पुढें साहेबाचे बंगले उठून नाचतमाशे, अभक्ष्यभक्षण व अपेयपान होत राहील. जैन लोकांच्या विनंत्या, त्यांचे अर्ज, डेप्युटेशनें यांची सरकारास काय पर्वा ? ज्यांना फायदा व्हावा ह्मणून मारवाडी लोक स्वजनद्रोह करण्यास उद्युक्त होतात, ते मारवाड्याची काय तरतूद ठेवतात हें पाहून तरी त्यांचे डोळ्यांत अंजन पडावें, ह्मणून परमेश्वरानें ही योजना केली असली पाहिजे ! संकटापासून मारवाड्यांनी बोध घेतला पाहिजे व प्रभूच्या संकेताप्रमाणें वागण्यास तयार झालें पाहिजे. परकी लोक काय करतात तें पहा ! हिंदुस्थानांत व्यापारासंबधीं होत असलेल्या नुकसानाची भरपाई होऊन व्यापारविषयक समतोलपणा ( Cmmercial balance ) दाखवा ह्मणून तुमचे सहस्त्रावधी देशबांधव आफ्रिकेंत गेले त्यांचे काय हाल होत आहेत ? अत्यंत जुलमी व अमानुष कायदे त्यांचेवर लादण्यांत येऊन त्यांना पशूप्रमाणें वागविण्यांत येत आहे व त्यांचे तेथील व्यापारविषयक वर्चस्व नष्ट करण्याचे सैतानी उद्योग चालू आहेत. यासाठीं सर्व व्यापार आपल्या हातीं घेणें अवश्य आहे व यासाठीं आमच्या धनाढ्य लोकांनीं कंबरा बांधल्या पाहिजेत. धनव्ययाचा मार्ग बदलला पाहिजे Commercial Swaraj व्यापारविषयक स्वराज्य मिळविण्यासाठीं हे उद्योग जारीनें केले पाहिजेत. या मार्गांत अडचणी येतील नुकसान होईल परंतु त्यास इलाज नाहीं. देशाचें नष्टचर्य संपविण्यासाठीं हे सर्व हाल सोसलेच पाहिजेत. ह्मणूनच तरुणांच्या मनांत हे विचार भरवून देणाऱ्यासंस्था निर्माण झाल्याच पाहिजेत. आमच्या बंगाल्यांत व तुमच्या शहरांत राष्ट्रीय शिक्षणसंस्था निर्माण करण्याविषयीं उद्योग होत आहेत हें सुचिन्ह होय. बंगाल्यांत पुष्कळ ठिकाणीं अशा संस्था अस्तित्वांत येत आहेत. उगाच पोपटपंचीच्या मार्गानें अनवश्यक शिक्षण देऊन तरुण लोकांच्या

बुद्धीचा व बलाचा अपव्यय करणारें शिक्षण नको आहे. स्वसंरक्षण व देशभक्ति यांचा मनोहर संगम करतां आल्यास फार उत्तम, पण सरकारच्या हलक्या दर्जाच्या नोकऱ्या करून पोट भरण्याविषयीं आसक्ति बाळगून सर्व राजकीय नीतिमत्तेचा व राष्ट्रीय उन्नतीच्या कल्पनांचा खग्रास करणारें विषारी शिक्षण आतां आमच्या मुलांना क्षणभरही नको आहे. राष्ट्रीय पद्धतीवर राष्ट्रीय सत्तेखालीं (On National lines and under National Control) शिक्षण देण्यांत आलें पाहिजे. राष्ट्रीय चैतन्याचा विकास करणारें व स्वत्व विसरून मी माझ्या देशाकरितां, मला स्वतंत्र अस्तित्व नाहीं, अशी उच्चतम कल्पना मनांत ठसविणारें खरें शिक्षण होय. National lines and National control हे शब्द ह्मणूनच महत्वाचे आहेत व हे शब्द राष्ट्रीयसभेच्या ठरावांत असले पाहिजेत असा आह्मी जो आग्रह धरतों तो यासाठींच. राष्ट्रीय शिक्षणाचें हें काम श्रीमंत लोकांनीं व विद्वान थोर पुरुषांनीं मनवर घेतल्याशिवाय होणें शक्य नाहीं. धनिकांचा पैसा या मार्गानें गेल्यास त्याचें पूर्ण चीज झाल्याशिवाय रहाणार नाहीं. भावी प्रजा सुदृढ व शरीरानें आणि मनानें खंबीर होण्यासाठीं सर्वांनीं अंतःकरणपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत, देशाच्या अत्यंत अप्रसिद्ध ठिकाणीं देखील ही राजकीय कल्पनांची लाट पोहोंचविली पाहिजे. मागें पहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. व्यापारविषयक स्वराज्य, शिक्षणविषयक स्वराज्य तुह्मी काबीज केल्यावर राजकीय स्वराज्याचा मार्ग सोपा आहे !

